# जातिभेद आणि बुद्ध

9.5





भिक्षु धर्मरक्षित

# जाति भेद आणि बुद्ध

भिक्षु धर्मरक्षित



प्रकाशक—




कबीरचौरा, वाराणसी–१
उत्तर प्रदेश



# निवेदन

जाति-भेद मानव-समाजाचा फार मोठा कलंक आहे. या बाबतींत जितके लिंहावे, थोडेंच होईल. मी त्रिपिटकांत आलेल्या, जातिभेदा-संबंधी सूत्रांचे संकलन करून आपल्या समोर प्रस्तुत केले आहे,

वाचक याचे स्वागत करतील अन् जाति-भेदा सारख्या महाअनिष्ट-कारक गोष्टीस सोडून मानव-मात्रास एक सारखे समजतील.

सारनाथ, वाराणसी

—भिक्षु धर्मरक्षित

# अ नु क्र म



# जाति भेद कृत्रिम आहे

## कोणी ब्राह्मण कसा असेल ?

एकदां भगवान् इच्छानङ्गल येथील वनखण्डांत विहार करीत होते. त्याच समयीं अनेक प्रतिष्ठित अन् मातबर ब्राह्मण—जसें चंकि, तारुक्ष, जानुस्सोणि, तोदेय्य अन् दुसरे ही कित्येक ब्राह्मण तेथें वास करीत असत.[1] वासिष्ठ अन् भारद्वाज या दोन माणवांत (विद्यार्थी) फिरतां-फिरतां या गोष्टी घडल्या,

"ब्राह्मणाची उत्पत्ति कशी होते ?"

"जेव्हां पुरुष दोन्हीं कडून, म्हणजे आई अन् वडिलांच्या पवित्र वंशांतून उत्पन्न होतो. (माता-पिता) दोन्हीं बाजूंच्या पितामहांच्या सात पिढ्यांपावेतो च लत आलेल्या पवित्र अन् जातिवादापासून अलिप्त, अनिन्दित अशा वंशातून ब्राह्मणाची उत्पत्ति होते."—भारद्वाज माणव म्हणाला.

त्यावर वासिष्ठ म्हणाला, "जेव्हां माणूस शीलवान अन् व्रत संपन्न निपजतो, तेव्हांच तो ब्राह्मण होतो."

भारद्वाज वासिष्ठ माणवास संतुष्ट करूं शकला नाहीं अन् वासिष्ठ ही भारद्वाजाचे समाधान करूं शकला नाहीं. तेव्हां वासिष्ठाने भारद्वाज माणवास अशा प्रकारें संबोधित केले,

---

(१) चंकि इत्यादि पांच ब्राह्मण राजा प्रसेनजित् यांचे पुरोहित होते. जेव्हां जातींत शुद्धतेची आवश्यकता पडत असे तेव्हां इतर ही कांही ब्राह्मणांसह ते सहा-सहा महिन्यांनी एकत्र जमत. त्यावेळीं, जातीच्या शुद्धी साठीं उक्कट्ठा येथें पौष्करसाति जवळ आणि मंत्रांच्या शुद्धीसाठीं इच्छानंगल येथें एकत्र व्हावे लागे. त्यावेळीं मंत्रांच्या शुद्धीसाठीं सर्व एकत्र जमले होते—अट्ठकथा

"शाक्यकुळांत प्रव्रजित शाक्यपुत्र श्रमण गौतम इच्छानङ्गल येथील वनखण्डांत विहार करतात. त्या गौतमांचे यश अशा प्रकारें पसरलें आहे—'ते भगवान् अर्हत् सम्यक सम्बुद्ध, विद्याचरणानें संपन्न, सुगत, लोकविद्, अनुत्तर ( सर्वोतम ) पुरुषांचे चाबुकस्वार, देव अन् मानवांचे उपदेष्टा अन् भगवान आहेत".

तिथेंच चला भारद्वाज! जिथें श्रमण गौतम आहेत, तिथेंच चलूं या! त्यांना ही गोष्ट विचारुं! ते म्हणतील ती गोष्ट धारण करूं!"

"फार छान!" भारद्वाज म्हणाले.

मग वासिष्ठ अन् भारद्वाज, भगवान होते तिथें गेले. तिथें जाऊन भगवानांस सम्मोदन करून एकीकडे जाऊन बसले. मग वासिष्ठ म्हणाले, "मी पौष्करसाति येथील अन् हा तारुक्ष येथील प्रसिद्ध तीन्ही वेदांचा ज्ञाता आहे. त्रिविद्यांचे जे आख्यान आहे त्यांत आम्हीं अद्वितीय आहोंत. पद, व्याकरण अन् वाद यांत आम्हीं आपल्या आचार्यांच्या समकक्ष आहोंत. हे गौतम! आम्हां परस्परांत जातिवादाबद्दल विवाद आहे. भारद्वाज म्हणतो, 'ब्राह्मण, जन्मानेंच ब्राह्मण असतो. अन् हे चक्षुमान, मी म्हणतो 'कर्मानें'. आम्ही दोघेही एक दुसऱ्याचे समाधान करण्यांत असमर्थ आहोंत. तेव्हां, 'सम्बुद्ध' हे नांव ऐकून आम्हीं भगवानांजवळ आलो आहोंत. ज्याप्रमाणें लोक अक्षय चन्द्रमास हात जोडून वंदन करतात त्याप्रमाणेंच गौतमांस ही नमस्कार करतात. जगाचे 'चक्षु' अशा आपणांस आम्हीं विचारतो. आम्हां अजाणांस आपण सांगा, 'ब्राह्मण जन्मानेंच ब्राह्मण असतो की कर्मानें'?"[२]

---

२—मनुस्मृतींत देखील असे आहे—

"उत्पत्तिरेव विप्रस्य मूर्त्तिर्धर्मस्य शाश्वती।
साहि धर्मार्थमुत्पन्नो ब्रह्मभूपाय कल्पते ॥"



## मानवांत जातिभेद नाहीं.

तेव्हां भगवान म्हणाले,

"मी क्रमशः यथार्थ आहे ते सांगतो—ज्याप्रमाणें इतर प्राण्यांत अन् जातींत एक दुसऱ्यांत भेद आहेत, त्याप्रमाणेंच तृण अन् वृक्ष यांत ही आहेत, परंतु ते तशी प्रतिज्ञा करीत नाहींत. किडया अन् चिलटांपासून घेऊन मुंगीपावेतों सर्व प्राण्यांत आपल्या जातीची खूण आहे. त्यांत भिन्न-भिन्न जाती आहेत. लहान मोठ्या चतुष्पादांत ही जातीची चिन्हें आहेत, त्यांत ही भिन्न-भिन्न जाती आहेत. लांब पाठीचे, पादोदर, ( उदर पायांचे काम करते असे प्राणी ) सर्पांत, पाण्यांत राहणाऱ्या मासोळयांत देखील, आकाशांत विचरण करणाऱ्या पत्रयान ( पंख ज्यांचे यान आहेत असे प्राणी ) पक्ष्यांत देखील जातीची खूण आहे. त्यांच्या जाती भिन्न-भिन्न आहेत. परंतु, ज्याप्रमाणें या प्राण्यांत वेगवेगळया खुणा आहेत त्याप्रमाणें माणसांत जातिभेदाच्या कोणत्याही खुणा नाहींत. न केंसात, न नाकांत, न ओठांत, न उदरांत, न गौप्य स्थानांत, न मैथुनांत, न हातांत, न पायांत, न नखांत, न जंघेंत, न उरूंत, अन् न वर्णांत अगर स्वरांत ही कोणता भेद नाहीं. शरीरधारी, जितके प्राणी आहेत, त्यांत जाति पृथक करणारी लक्षणें स्पष्ट दिसत असतात परंतु मानवांत अशी लक्षणें दिसत नाहींत. मानवांत, भेद फक्त संज्ञेंत आहे.

## कर्मानुसार नामकरण होते.

वासिष्ठ ! मानवांत जो गोरक्षेनें जीविका करतो, त्यास कृषक समज, तो ब्राह्मण नव्हे. जो शिल्पकलेनें जीविका करतो त्यास शिल्पकार जाण, ब्राह्मण नाहीं. जो व्यापार करून उदर निर्वाह करतो त्यास वणिक समज, ब्राह्मण नव्हे. जो पोचविण्याचे काम करतो त्यास प्रेषक समज, तो ब्राह्मग नव्हे. मानवांत जो न देतां दुसऱ्याच्या पैशानें जीवन-यापन करतो त्यास चोर समज, तो ब्राह्मण नव्हे. जो धनुष्य बाणानें जिवंत आहे, तो योद्धा

( शिपाई ) आहे वासिष्ठ ! तो ब्राह्मण नव्हे. मानवांत जो पौरोहित्य करून जिवंत राहतो त्यास याचक समज. तो ब्राह्मण नव्हे. मनुष्यांत जो ग्राम अन् राष्ट्राचा उपभोग करतो अशा माणसास राजा समज. तो ब्राह्मण नव्हे.

## ब्राह्मण जन्मापासून ब्राह्मण नसतो

माता आणि योनीपासून उत्पन्न झाल्या कारणानें, मी कुणास ही ब्राह्मण म्हणत नाहीं. तो 'भोवादी' आहे. मी ब्राह्मण त्यास म्हणतां जो याचना करीत नाहीं, ज्यानें सर्व बंधनें तोडून टाकली आहेत. जो राग आणि आसक्तीपांसून विरत आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो. नन्दी राग, वरत्रा, ( तृष्णा रूपी दोरी ) सन्दान ( बासष्ट प्रकारांचे मतवाद रूपी दावण ) अन् हनुक्रम ( तोंडावर बांधण्याचे जावे ) कापून अन् जूं फेंकून जो बुद्ध झाला आहे, त्यास मी ब्राह्मण म्हणतो.

जो चित्त दूषित न करतां, शिव्या, वध आणि बंधन सहन करतो, क्षमाबल हेंच ज्याचे सैन्यबल आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो क्रोध-रहित, व्रतवान, शीलवान, बहुश्रुत, संयमी अन् अन्तिम शरीरधारी आहे, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. कमळाच्या पानावर अन् करवतीच्या टोंकावर शिरसाप्रमाणें जो भोगांत लिप्त होत नाहीं, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो याच जन्मी आपल्या दुःखांचा विनाश ओळखतो, ज्यानें आपल्या वरील भार मुक्त केला आहे अन् जो आसक्ति रहित आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो.

जो गंभीर, प्रज्ञावान, मेधावी, मार्ग-अमार्गाचा ज्ञाता अन् उत्तम पदार्थ प्राप्त करणारा आहे, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. घरांतील व घरा-बाहेरील लोकांत जो लिप्त होत नाहीं, ज्याचे कोणतेही निश्चित ठिकाण नाहीं अन् ज्याची कांही इच्छा नाहीं, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो आपल्या विरोधी जनांत विरोध रहित होऊन राहतो, जो दण्डधारी

पुरुषांत दण्ड-रहित असतो, संग्राही लोकांत जो संग्रह-रहित असतो, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो अशा प्रकाराची कोमल अन् आदरयुक्त अन् सत्यवाणी बोलतो, ज्यामुळें कुणास ही पीडा होत नाहीं, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. वस्तू मोठी असो अगर लहान असो, जाड असो किंवा पातळ असो, शुभ असो किंवा अशुभ असो, जो जगांत कोणती ही वस्तू दिल्याशिवाय घेत नाहीं, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. या लोकाविषयीं किंवा पर लोकाविषयी ज्याच्या मनांत कोणती ही आशा शिल्लक नाहीं, जो आशारहित अन् आसक्ति रहित आहे, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. ज्याला तृष्णा नाहीं, जो जाणून अकथ पद ( निर्वाण ) प्राप्त करणारा आहे, ज्यानें घट्ट अमृत प्याले आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो चन्द्राप्रमाणें विमल, शुद्ध, स्वच्छ, अनाविल आहे अन् ज्याची सर्व जन्मांची तृष्णा नष्ट झाली आहे, त्यास मी ब्राह्मण म्हणतो.

ज्यानें या दुर्गम संसारांतील चक्रांत टाकणाऱ्या मोहरूपी मार्गाचा त्याग केला आहे, जो संसार पारंगत, ध्यानी अन् उतीर्ण आहे, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो येथील भोग सोडून, घरदार सोडून संन्यासी झाला आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो येथील तृष्णेचा त्याग करून, घरदार सोडून प्रव्रजित झाला आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो. मानवी भोगांचा त्याग करून, दिव्य भोगांचा लाभ ही ज्यानें त्यागला आहे, कोणत्याही भोगांत ज्याची आसक्ति नाहीं त्यास मी ब्राह्मण म्हणतो. रति अन् अरति सोडून जो शीतल स्वभाव अन् क्लेश रहित आहे, जो सर्व लोक विजयी वीर आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो प्राण्यांचा मृत्यू अन् त्याच्या उत्पत्ति बद्दल नीट प्रकारें जाणतो,जो आसक्ति रहित सुगत (सुन्दर गतीस प्राप्त ) अन् बुद्ध आहे, त्यास मी ब्राह्मण म्हणतो. ज्याची गति देव, गन्धर्व किंवा मानव जाणत नाहींत, जो क्षीणाश्रव अन् अर्हंत आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो. ज्याया आदि अन्त किंवा मध्य नाहीं, जो परिग्रह रहित, आदान रहित आहे त्यास मी ब्राह्मण म्हणतो. जो श्रेष्ठ, वीर,

प्रवर, महर्षि, विजेता, अकम्प, स्नातक अन् बुद्ध आहे त्यास मी ब्राह्मण समजतो. ज्याला जन्माचे ज्ञान आहे, जो स्वर्ग अन् च्युति यांचे दर्शन करूं शकतो, ज्याचा जन्म क्षीण झाला आहे, जो अभिज्ञा परायण मुनि आहे, ज्याची सर्व कृत्यें समाप्त झाली आहेत त्यास मी ब्राह्मण म्हणतो.

## जातिभेद कृत्रिम आहे.

लोकांत अशा संज्ञा आहेत, ही कृत्रिम नांव-गोत्रें आहेत, हा कृत्रिम लोकव्यवहार चालत आला आहे. अज्ञ लोकांच्या धारणेंत चिरकालापासून हा शिरत आला आहे. परंतु जाणकार कधीं ही म्हणत नाहींत की ब्राह्मण जन्मानें ब्राह्मण असतो.

## जातिभेद कर्मामुळें

जन्मानें कुणी ब्राह्मण होत नाहीं अन् जन्म नसल्यामुळें कुणी अब्राह्मण होत नाहीं. कर्मानेंच माणूस ब्राह्मण होतो किंवा अब्राह्मण. कर्मानें कृषक होतो अन् कर्मानेंच कुणी शिल्पी होतो. कर्मानें वाणी होतो अन् प्रेषक ही कर्मानेंच होतो. कर्मानें कुणी चोर होतो अन् युद्धजीवी ही कर्मामुळेंच होतो. कर्मानेंच याचक बनतो अन् राजा ही आपल्या कर्मानेंच राजा म्हणवितो. प्रतीत्य-समुत्पाददर्शी अन् कर्म विपाक जाणणारे पण्डित जन ही या प्रमाणें कर्माचे यथार्थ रूप जाणतात.

## लोक कर्मामुळेंच चालत आहेत

लोक कर्मानें चालत आहे. प्रजा ही कर्मामुळेंच चालत आहे. चालणाऱ्या रथांत फिरणाऱ्या चाकाप्रमाणें, सर्व प्राणी कर्मांत बांधलेले आहेत. तप, ब्रह्मचर्य, संयम, दम या सर्वांमुळें कोणी ब्राह्मण निपजतो. तोच उत्तम ब्राह्मण आहे, वासिष्ठ ! तिन्ही विद्यांनी युक्त, शांत अन् पुनर्जन्म रहित व्यक्तींस तू विज्ञांचा ब्रह्मा अन् शुक्र ( इन्दु ) जाण ![३]

---

३—मज्झिम-निकाय २, ५, ८.

# ब्राह्मणांपाशीं काय प्रमाण आहेत ?

"हे गौतम ! ब्राह्मण म्हणतात—'ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे, इतर दुसरे वर्ण क्षुद्र आहेत. ब्राह्मण हाच शुक्लवर्ण आहे, इतर वर्ण कृष्ण आहेत. ब्राह्मणंच शुद्ध आहेत, अब्राह्मण नव्हेत. ब्राह्मण हेच ब्रह्माचे औरस पुत्र आहेत, त्यांच्या मुखांतून त्यांची उत्पत्ति आहे, ते ब्रह्मनिर्मित आहेत, ब्रह्माचे उत्तराधिकारी आहेत.[४] या बद्दल आपलें काय मत आहे ?"

## ब्रह्मज म्हणणें चूक आहे

"परंतु, हे आश्वलायन ! ब्राह्मणांच्या स्त्रिया ऋतुमति अन् गर्भिणी होतात, प्रसव करतात अन् दूध पाजतांना दिसतात. योनीतून उत्पन्न होऊन ही ते असें म्हणतात—'ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे."

"जरी आपण असें म्हणता, तरी ब्राह्मण तर हेंच म्हणतात की ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे."

---

४—"ब्राह्मणोस्य मुखमासीद् बाहू राजन्यः कृतः ।
उरू तदस्य यद् वैश्यः पद्भ्यां शूद्रो अजायत ॥"

हा मन्त्र सामवेदांत सोडून इतर तिन्ही वेदांत ( ऋग्वेद १०।९०। १२, अथर्ववेद १९।६।६ आणि यजुर्वेद ३१।११ ) थोडा फार फेरबदल करुन मिळतो. पण्डित मेजर बी० डी० बसुने लिहिले आहे की हा मन्त्र पूर्वीचा आहे. तरी पण पाली वाङ्मयाने प्रकट होते की बुद्धकाळांत ही हा वेदांत वर्तमान होता ज्याचे खण्डन भगवान बुद्धांनी केले, परंतु सम्प्रति, यांत थोडे फार परिवर्तन अवश्य झाले आहे जे अट्टकथा ग्रंथास पाहिल्यानें स्पष्ट कळून येते.

## आर्य दास अन् दास आर्य होऊं शकतो

"तर, तूं काय मानतोस आश्वलायन! तूं ऐकले असशील की यवन, कम्बोज अन् दुसऱ्या सीमान्त देशांत देखील दोनंच वर्ण असतात—आर्य अन् दास (गुलाम). आर्य दास होऊं शकतो अन् दास ही आर्य होऊं शकतो.[५]"

"होय, मी असें ऐकले आहे की यवन आणि कम्बोज देशांत असे होते."

"आश्वलायन! ब्राह्मणांजवळ काय प्रमाण आहेत? जे म्हणतात की ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे!"

"जरी आपण असे म्हणता तरी ब्राह्मण तर आपलीच गोष्ट खरी करतात."

## सर्व जाति समान आहेत

"तर, तू काय मानतोस आश्वलायन! क्षत्रिय जर प्राणी–हिंसक, चोर, दुराचारी, असत्य वचनी, चुगलखोर, कटुभाषी, व्यर्थ बडबड करणारा, लोभी, द्वेषी अन् खोटी धारणा करणारा असेल तर तो ही काया सोडून मेल्यानंतर नरकांत जाणार नाहीं काय? ब्राह्मण, वैश्य, शूद्र, जर प्राणी-हिंसक असतील तर ते काय नरकांत उत्पन्न होणार नाहींत?"

---

५—ऋग्वेदांत (१।४।१०।८) देखील आले आहे—

"विजानीहि आर्यान ये च दस्यवः।
बर्हिष्मते रन्थया शासद् अव्रतान ॥"

अन् आपस्तम्ब सूत्रांत—

"धर्मचर्यया जघन्यो वर्णः।
पूर्व-पूर्वं वर्णं मापद्यते·जाति परिवृत्तौ ॥"

"हे गौतम ! क्षत्रिय जर प्राणी हिंसक असेल तर तो नरकांत पडेल, अन् ब्राह्मण, वैश्य अन् शूद्रांची ही तीच गति होईल."

"तर, हे आश्वलायन ! ब्राह्मणांजवळ असे काय प्रमाण आहेत ?"

"परंतु ब्राह्मण तर असेंच म्हणतात !"

"मग, तुझें काय मत आहे, आश्वलायन ! काय, फक्त ब्राह्मणंच जीव हिंसेपासून विरत होऊन, चांगल्या गतीस प्राप्त होऊन स्वर्ग लोकांत उत्पन्न होऊं शकतात ? क्षत्रिय, वैश्य, शूद्र वर्णीय लोक नाहीं ?"

"नाहीं गौतम ! क्षत्रिय देखील प्राणिहिंसेपासून विरत होऊन चांगली गति प्राप्त करून स्वर्ग लोकांत उत्पन्न होऊं शकतो अन् ब्राह्मण, शूद्र वर्णीय लोक देखील !"

"तर मग, आश्वलायन, ब्राह्मणांजवळ असे कोणते प्रमाण आहेत की ज्यामुळें ते असें म्हणतात ?"

"काय विचार आहे आश्वलायन ? काय ब्राह्मणंच वैर रहित, द्वेश रहित, मित्र भाव व्यक्त करूं शकतो ? क्षत्रिय, वैश्य अन शूद्र करूं शकत नाहीं ?"

"नाहीं गौतम ! क्षत्रिय देखील अशी भावना व्यक्त करूं शकतो अन् ब्राह्मण, वैश्य अन् शूद्र देखील !"

"तर मग आश्वलायन, ब्राह्मणांजवळ असे कोणते प्रमाण आहेत की ते असें म्हणतात ?"

"मग काय म्हणतोस आश्वलायन ! जर, इथें अभिषेक प्राप्त क्षत्रिय राजा, नाना जातींचे शंभर पुरुष एकत्र करून त्या सर्वांस असे म्हणो की तुम्हीं सर्व जे क्षत्रिय कुळांतले, ब्राह्मण कुळांतले, अन् राजन्य कुळांतून उत्पन्न आहांत, इथें या अन् शाल वृक्षाच्या किंवा सरल वृक्षाच्या किंवा चन्दन अगर पद्म काष्टाची उत्तराणी ( घासून अग्नि उत्पन्न करण्याचे लाकूड ) घेऊन अग्नि उत्पन्न करा, तेजाने प्रादुर्भूत करा अन् तुम्हीं ही

या जे चाण्डाल कुळांत किंवा निषाद कुळांत किंवा बसोर किंवा रथकार किंवा पुक्कुस कुळांत उत्पन्न आहांत, इथें या अन् कुत्र्याची पिण्याची कठरी किंवा रेंडच्या लाकडाची उत्तराणी घेऊन अग्नि तयार करा, त्यास तेजाने प्रादुर्भूत करा. तुला काय वाटते आश्वलायन ! क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य अन् शूद्र कुळांत उत्पन्न व्यक्तींनी शाल, सरल, चन्दन अन् पद्म काष्ठाच्या उत्तराणीने जो अग्नि तयार केला आहे, तेज प्रादुर्भूत केला आहे काय तोच फक्त तेजयुक्त, वर्णवान अन् प्रभास्वर अग्नि राहील ? काय त्यानेंच अग्नीचे काम केलें जाऊं शकेल ? चाण्डाल, निषाद, बसोर, रथकार अन् पुक्कुस कुळांत उत्पन्न व्यक्तींनी तयार केलेल्या अग्नीतून उपयोग होणार नाहीं ?"

"नाहीं गौतम ! क्षत्रिय कुळांत उत्पन्न व्यक्तीनें तयार केलेल्या अग्नींत ही तेज राहील, त्या अग्नीचा ही तसाच उपयोग केला जाईल जसा चाण्डाल कुळांत उत्पन्न व्यक्तींने केलेल्या अग्नीचा होईल अन् तो अग्नी ही तसाच तेजयुक्त राहील. सर्व प्रकारच्या अग्निपासून उपयोग करतां येईल."

"तर, आश्वलायन ! ब्राह्मणांजवळ असे काय प्रमाण आहेत की ते असें म्हणतात ?"

"तर, तूं काय म्हणतोस आश्वलायन ? जर क्षत्रिय कुमार एखाद्या ब्राह्मण कन्येशी सहवास करील तर त्यांचा पुत्र मातेप्रमाणें ब्राह्मण किंवा पित्याप्रमाणें 'क्षत्रिय' म्हटला जाईल ?"

"होय, गौतम ! असें म्हणावे लागेल."

"आश्वलायन ! जर ब्राह्मण कुमार क्षत्रिय कन्येशीं सहवास करील अन् त्यापासून जर पुत्र उत्पन्न झाला तर तो मातेप्रमाणें क्षत्रिय अन् पित्याप्रमाणें ब्राह्मण म्हटला जाईल ?"

"होय, म्हटला जाईल !"

"आश्वलायन ! जर घोडीचा गाढवाशी संबंध जुळवून आणला, अन् त्यानें जो प्राणी उत्पन्न होईल त्यास 'माता'-'पिता' प्रमाणें 'घोडा' अन् 'गाढव' असे क्रमानुसार म्हटलें जाईल ?"

"हे गौतम ! तो खेंचर म्हटला जाईल. इथें, भेद स्पष्ट दिसून येतो. त्यांच्यांत भेद दिसत नव्हता."

"आश्वलायन ! इथें दोन माणव जुळे भाऊ आहेत. एक अध्ययन करणारा अन् उपनीत आहे तर दुसरा अध्ययन करणारा परंतु अनुपनीत आहे. श्राद्ध, यज्ञ किंवा पाहुणचारांत, ब्राह्मण कुणास प्रथम खायला देईल ?"

"हे गौतम ! जो माणवक अध्ययन करणारा अन् उपनीत आहे त्यास प्रथम भोजन देण्यांत येईल. अध्ययन करणाऱ्या अनुपनीत माणसास भोजन देऊन काय महाफल मिळेल ?"

"तर, काय मानतोस आश्वलायन ! समज, दोन माणवक जुळे भाऊ आहेत. एक अध्ययन करणारा, उपनीत परंतु दुःशील अन् पापी आहे तर दुसरा अध्ययन करणारा, अनुपनीत परंतु शीलवान् अन् पुण्यात्मा आहे. या दोघांत श्राद्ध, यज्ञ किंवा पाहुणचारांत प्रथम कुणास भोजन दिलें जाईल ?"

"हे गौतम ! जो माणवक अध्ययन न करणारा, अनुपनीत, परंतु शीलवान् अन् कल्याण धर्माचे पालन करणारा आहे त्यालाच प्रथम भोजन देण्यांत येईल ! दुःशील, पापधर्म्यास दान दिल्यानें काय महाफळ मिळेल ?"

"आश्वलायन ! प्रथम तू जातीवर पोंचालास, जातीनंतर मंत्रावर, मंत्रानंतर तूं आतां चातुर्वर्ण्य शद्धीवर आलास, ज्याचा मी उपदेश करतो,"

असें म्हटल्यावर आश्वलायन माणवक चुप झाला; मूक झाला. अधो-मुख, चिन्तित अन् निष्प्रभ होऊन बसला. तेव्हां भगवान त्यास म्हणाले—

## ब्राह्मणांस श्रेष्ठ म्हणणें चूक आहे

"हे आश्वलायन ! पूर्व काळांत, जंगलांत पर्ण कुटींत वास करीत असतां, सात ब्राह्मण ॠषींस या प्रकारची वाईट दृष्टी उत्पन्न झाली— "ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे", आश्वलायन ! तेव्हां असित देवल ॠषींनी ऐकले—'सात ब्राह्मण ॠषींस अशा प्रकारें पापदृष्टी उत्पन्न झाली', तेव्हां, हे आश्वलायन ! असित देवल ॠषींनी मुंडन करून, लाल रंगाचा धुस्सा नेसून, खडाव घालून अन् सुवर्ण अन् चांदीचा दंड धारण करून त्या सात ॠषींच्या पर्णकुटीच्या अंगणांत प्रादुर्भूत झाले. असित देवल त्या पर्णकुटीत हिंडत असतां म्हणाले, 'हे काय ? तुम्हीं ब्राह्मणॠषी कुठें निघून गेलात ?' तेव्हां, हे आश्वलायन ! त्या सात ब्राह्मण ॠषींच्या मनांत असे आले की 'हा कोण गांवठी आला आहे, जो आमच्या कुटींत अशा प्रकारची भाषा करीत आहे ? खरं म्हटलं तर यास शाप दिला पाहिजे. 'तेव्हां, हे आश्वलायन ! सात ब्राह्मण ॠषींनी असित देवल ॠषींस शाप दिला, "शूद्र ! भस्मसात होऊन जा !"

हे आश्वलायन ! जस-जसे ते सात ब्राह्मण ॠषी असित देवल यांस शाप देत तसतसे देवल ॠषी जास्त सुन्दर, दर्शनीय अन् प्रासादिक होत. त्यानंतर, हे आश्वलायन ! त्या सात ब्राह्मण ॠषींच्या मनांत विचार आला—आमचे तप व्यर्थ आहे, ब्रह्मचर्य, निष्फल आहे. आम्ही पूर्वी ज्या कुणास असा शाप देत असूं; 'वृषभ ! भस्म हों', तो भस्म होऊन जायचा, परंतु आम्ही जस-जसा शाप देतो तसतसा हा जास्त सुन्दर होत आहे."

"तुमचे तप व्यर्थ नाहीं, ब्रह्मचर्य निष्फल नाहीं, परंतु तुमचे मन माझ्या प्रति दूषित झाले आहे, त्याचा त्याग करा."

तेव्हां ते साती ऋषी म्हणाले, "आमच्यांत जो मानसिक दुर्भाव आहे त्याचा आम्ही त्याग करतो. आपण कोण आहांत ?"

"आपण असित देवल ऋषींचे नांव ऐकले आहे ?"

"होय !"

"तोच आहे मी."

"हे आश्वलायन ! साती ब्राह्मण ऋषी असित देवल ऋषींस अभिवादन करून त्यांच्या जवळ गेले. असित देवल म्हणाले, 'मी असें ऐकले आहे की अरण्यांत, पर्णकुटींत वास करीत असतां सात ऋषींस अशा प्रकारें वाईट धारण झाली की ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे."

"होय."

"आपणांस विश्वाश आहे की आपली माता ब्राह्मणापाशीच गेली होती, अब्राह्मणापाशी नाहीं ? आपणास ठाऊक आहे की आपल्या आईची आई, सात पिढ्यांपावेतो मातामह-युगल ब्राह्मणांजवळच्च गेली होती, अब्राह्मणांजवळ नाहीं ?"

"नाहीं."

"गर्भधारणा कशी होते हे आपणांस ठाऊक आहे ?"

"होय, जेव्हां माता-पिता एकत्र होतात, माता ऋतुमती असते अन् गन्धर्व ( उत्पन्न होणारे सत्त्व ) उपस्थित असतो, तेव्हां या तीघांच्या एकत्र झाल्यानें गर्भ धारणा होते."

"आपणांस ठाऊक आहे की गंधर्व क्षत्रिय असतो की ब्राह्मण की वैश्य की शूद्र ?"

"नाहीं. हा गन्धर्व काय असतो ते आम्हांस ठाऊक नाहीं."

"जेव्हां अशी स्थिति आहे, तेव्हां आपणास ठाऊक आहे की आपण कोण आहांत ?"

"नाहीं आम्हांस ठाऊक नाहीं."

"हे आश्वलायन ! असित देवल ऋषीने जातिवादाबद्दल प्रश्न विचारल्यावर ते साती ब्राह्मण त्यांचे उत्तर देऊं शकले नाहीं, तर आज तूं काय उत्तर देशील जेव्हां आपली सर्व विद्वत्ता असून ही तू त्यांच्या सैंपाक्याच्या लायकीचा आहेस ![६]

——:०:——

६—मज्झिम निकाय—२, ५, ३.

# चारी वर्ण समान आहेत

## ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण ही व्यर्थची ओरड आहे

"हे कात्यायन ! ब्राह्मण म्हणतात—"ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे, इतर वर्ण हीन आहेत. ब्राह्मण हाच शुक्ल वर्ण आहे अन् इतर वर्ण कृष्ण आहेत. फक्त ब्राह्मणंच शुद्ध असतात अब्राह्मण शुद्ध नसतात. ब्राह्मण हेच ब्रह्माचे औरस पुत्र आहेत,"

( १ ) तर काय मानता महाराज ! जर क्षत्रिय आपले धंन-धान्य, चांदी-सोन्याने ( नोकरास ) मानेल तर तो मालकाच्या पूर्वी उठणारा, मालिक झोपल्यावर उठणारा, मालिक झोपल्यावर 'काय काम आहे ?" असे विचारणारा, मनाच्या अनुकूल काम करणारा, प्रियवादी होइल की नाहीं ? ब्राह्मण ही अन् शूद्र ही ?"

"हे कात्यायन ! जर क्षत्रिय इच्छा करेल तर तो ही प्रियवादी होईल, ब्राह्मण ही अन् वैश्य अन् शूद्र ही होईल."

"तर काय म्हणता, महाराज ! ब्राह्मण जर आपल्या धनाने इच्छा करेल तर ब्राह्मण ही त्याचा प्रियवादी होईल, वैश्य ही होईल अन् क्षत्रिय देखील होईल."

"महाराज ! जर वैश्य इच्छा करेल तर ?"

"हे कात्यायन ! वैश्य जर इच्छा करेल तर वैश्य ही त्याचा प्रियवादी होईल, शूद्र देखील होईल, क्षत्रिय अन् ब्राह्मण देखील होईल."

"महाराज ! शूद्र जर आपल्या धनाने आपल्या चाकरास मानेल तर ?"

"कात्यायन ! जर शूद्र इच्छा करेल तर शूद्र ही त्याचा प्रियवादी होईल, क्षत्रिय ही, ब्राह्मण ही अन् वैश्य ही."

"तर काय म्हणतां, महाराज ? असे असेल तर चारी वर्ण समान आहेत. काय वाटते तुम्हांला ?"

"अवश्य, हे कात्यायन ! असें झाले तर चारी वर्ण समान आहेत. इथें मला कोणता ही भेद दिसत नाहीं."

"महाराज ! अशा प्रकारें आपण समजले पाहिजे की लोकांत हा केवळ हल्ला आहे की ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे."

( २ ) "तर काय मानतां महाराज ? जर क्षत्रिय प्राणिहिंसक, चोर, दुराचारी, असत्य-वचनी, चुगल्या करणारा, कटुभाषी, बडबडया, लोभी, द्वेषी, खोटी धारणा करणारा असेल तर काय शरीर सोडल्यावर तो वाईट गतीस प्राप्त होऊन नरकांत पडणार नाहीं ? तुम्हांस काय वाटते ?"

"हे कात्यायन ! क्षत्रिय जर प्राणहिंसक असेल तर तो नरकांत उत्पन्न होईल. मी अर्हतांकडून देखील असेच ऐकले आहे."

"साधु-साधु, महाराज ! ठीक आहे महाराज ! तुम्हांस असे वाटत आहे अन् तुम्हीं अर्हतांकडून ही असेंच ऐकले आहे."

"तर, काय म्हणतां महाराज ! इथें कोणी ब्राह्मण, वैश्य, शूद्र प्राणहिंसेपासून विरत होऊन, सत्य धारणा करणारा असेल तर तो स्वर्गलोकांत उत्पन्न होईल किंवा नाहीं ?"

"उत्पन्न होईल."

"साधु-साधु महाराज ! असें असल्यावर, चारी वर्ण समान आहेत किंवा नाहीं ?"

"जरूर आहेत, कात्यायन."

"अशा प्रकारें तुम्हीं समजलं पाहिजे की लोकांत हा केवल हल्ला आहे की ब्राह्मण श्रेष्ठ आहे."

( ३ ) "तर काय मानता, महाराज ! कुणी क्षत्रीय जर भिंत फोडून चोरी करेल, गांवात लूटमार करेल, परस्त्री गमन करेल अन् जर राजपुरुष ( शिपाई ) त्याला धरून तुझ्या स्वाधीन करून तुला म्हणेल

" देव ! हा चोर आहे, अपराधी आहे, याला आपली इच्छा असेल तर दण्ड द्या, तर तूं काय करशील ?"

"हे कात्यायन ! मी त्यास प्राण-दंड, कारावास किंवा देश निर्वासनाचा दंड देईन, किंवा जसे कारण असेल तसे करेन. हे कशासाठीं ? हे कात्यायन ! त्याची क्षत्रिय ही जी संज्ञा होती ती आतां अंतर्धान झाली आहे. आतां, 'चोर' हीच त्याची संज्ञा आहे."

"तर, काय मानता महाराज ? जर ब्राह्मण, वैश्य किंवा शूद्र भिंत फोडून चोरी करेल तर तू काय करशील ?"

"हे कात्यायन ! मी त्यास दंड देईन, कारण आता चोर हेच त्याचे खरे नांव आहे."

"तर काय मानता महाराज ? असे असेल तर चारी वर्ण समान होतात किंवा नाहीं ?"

"अवश्य, हे कात्यायन !

अशा प्रकारें तुम्हीं समजले पाहिजे की हा केवळ हल्ला आहे की 'ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे.

( ४ ) "तर काय मानता महाराज ! जर कुणी क्षत्रिय, केंस अन् दाढीचे मुंडन करून, काषाय-वस्त्र धारण करून, घरदार सोडून, प्रव्रजित होऊन, प्राणहिंसा अन् चोरी पासून विरत होऊन, एकाहारी, शीलवान, पुण्यात्मा होईल तर त्याच्याशीं तूं काय व्यवहार करशील ?"

"हे कात्यायन ! त्यास अभिवादन करून आसन देईन. चीवर, पिण्डदान ( भिक्षा ), शयन, आसन, पथ्य ( ग्लानप्रत्यय ), औषध ( भैषज्य ) प्रदान करीन, त्याची धार्मिक रक्षा करीन. हे सवं कशासाठीं ? तर, हे कात्यायन ! प्रथम त्याची क्षत्रिय ही जी संज्ञा होती ती आतां अंतर्धान झाली, आतां, श्रमण हीच त्याची संज्ञा आहे."

"महाराज ! कुणी ब्राह्मण, वैश्य शूद्र केस अन् दाढीचे मुंडन

करून, प्रव्रजित होऊन, पुण्यात्मा होऊन येईल तर त्याच्याशी तू कसा व्यवहार करशील ?"

"हे कात्यायन ! त्यास अभिवादन करीन. त्याची धार्मिक रक्षा करीन. हे सर्व कशासाठीं ? हे कात्यायन ! त्याची, शूद्र ही जी संज्ञा होती ती अंतर्धान झाली. आतां, श्रमण हीच त्याची खरी संज्ञा आहे."

"तर काय मानतोस ? असे असल्यावर, चारी वर्ण समान आहेत किंवा नाहीं ?

"अवश्य, हे कात्यायन !"

"अशा प्रकारे देखील, हे महाराज ! अपणास हे समजले पाहिजे की लोकांत हा केवळ हल्ला आहे की ब्राह्मण हाच वर्ण श्रेष्ठ आहे."

——:o:——

# वर्णोत्पत्ति

## मानवांत धर्म हाच श्रेष्ठ आहे, जन्म नाहीं

"वासिष्ठ ! तू ब्राह्मण जातीतला अन् ब्राह्मणकुळांतला आहेस. ब्राह्मण कुळ सोडून, घरदार सोडून प्रव्रजित होण्यासाठीं आला आहेस यामुळें काय ब्राह्मण तुझी निंदा करीत नाहींत, तुझी टिंगल करीत नाहींत?"

"होय, भन्ते ! ब्राह्मण आपल्या अनुरूप, पूर्ण परिहासासह, आमची निंदा करतात, आमची टिंगल करतात."

"वासिष्ठ ! ते कशा प्रकारें तुमची निंदा करतात. कशा प्रकारें तुमची टिंगल करतात?"

"भन्ते ! ब्राह्मण लोक म्हणतात—"ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे अन् इतर वर्ण हीन आहेत. ब्राह्मण हाच शुक्ल वर्ण आहे, दुसरे वर्ण कृष्ण आहेत. ब्राह्मण हेच शुद्ध आहेत, अब्राह्मण नव्हे. फक्त ब्राह्मणंच ब्रह्माच्या तोंडांतून उत्पन्न झाले आहेत, तेच ब्रह्मजात आहेत, ब्रह्मनिर्मित आहेत अन् ब्रह्माचे उत्तराधिकारी आहेत. तर, तुम्हीं लोक श्रेष्ठ वर्णापासून खाली पडून नीच झाले आहांत. हे मुण्डे श्रमण नीच आहेत, कृष्ण आहेत. ब्रह्माच्या पायापासून उत्पन्न झाले आहेत. हे आपणांस शोभत नाहीं की आपला श्रेष्ठ वर्ण सोडून नीच वर्णीय लोकांबरोबर मैत्री करा ! ब्राह्मण अशाच प्रकारें निंदा करतात अन् हंसतात."

## ब्राह्मण खोटं बोलतात

"वासिष्ठ ! ते ब्राह्मण पूर्वीच्या गोष्टी विसरून गेले असल्या कारणानेंच असे म्हणतात की 'ब्राह्मण श्रेष्ठ वर्ण आहे.' वासिष्ठ ! ब्राह्मणांच्या बायका ऋतुमति होतात, गर्भिणी होतात, प्रसव करतात अन् मुलांस दूध पाजतांना दिसतात. ते ब्राह्मण योनींतून उत्पन्न होऊन ही असे म्हणतात

की 'ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे. ते ब्रह्माबद्दल ही खोटया गोष्टी सांगतात. मिथ्या भाषण करून ते बरेच पाप संचय करतात.

## धर्म हाच श्रेष्ठ

वासिष्ठ ! क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य अन् शूद्र हे चार वर्ण आहेत. क्षत्रियांत ही किती तरी लोक जीव-हिंसा करतात, चोरी करतात, व्यभिचार करतात, खोटें बोलतात, खोटी धारणा करतात. वासिष्ठ ! अशा प्रकारें, जे धर्म वाईट, सदोष, असेवनीय, अनार्य, कृष्ण, वाईट फलयुक्त अन् विद्वान लोकांद्वारा निन्दित आहेत तेच करतांना ते दिसतात. वासिष्ठ ! किती तरी ब्राह्मण, वैश्य अन् शूद्र जीव हिंसा करणारे, खोटें बोलणारे, चोरी अन् व्यभिचार करणारे अन् खोटी धारणा करणारे असतात. अशा प्रकारें, जे धर्म वाईट आहेत अन् विद्वान लोकांकडून निन्दित आहेत ते ही करतांना ते दिसतात.

वासिष्ठ ! कित्येक क्षत्रिय देखील जीवहिंसेपासून विरत असतांना दिसून येतात, चोरी न करणारे असतात, खरी धारणा करणारे आढळतात. वासिष्ठ ! अशा प्रकारे, जे धर्म उत्तम अन निर्दोष आहेत ते ही करतांना कित्येक क्षत्रिय दिसून येतात. ब्राह्मण ही, वैश्य ही, अन् कित्येक शूद्र ही.

वासिष्ठ ! या चार वर्णांत, अशा प्रकारें कृष्ण अन् शुक्ल धर्मांचे धारण करणारे, विद्वान जनांकडून निन्दित किंवा प्रशंसित कार्य करणारे, दोन्ही प्रकारचे लोक दिसून येतात. तर मग ब्राह्मण असे कसे म्हणतात. की 'ब्राह्मण हाच श्रेष्ठ वर्ण आहे ?'

विद्वान जन असे मानत नाहींत ते कां ? वासिष्ठ ! याच चार वर्णांत जो भिक्षु अर्हत् ( जीवन-मुक्त ), क्षीणाश्रव, ब्रह्मचारी, कृतकृत्य, भारमुक्त परमार्थ ( निर्वाण ) प्राप्त, भवबन्धन रहित, ज्ञानी अन् विमुक्त असतो तोच सर्वांच्या पुढे जातो. फक्त धर्मानेंच, अधर्माने नव्हे.

वासिष्ठ ! मानवांत फक्त धर्मच श्रेष्ठ आहे, या जन्मांत देखील अन् परजन्मांत ही. वासिष्ठ ! तेव्हां,या प्रकारें ही समजले पाहिजे की मानवांत धर्म हाच श्रेष्ट आहे. वासिष्ठ ! कोशलराज प्रसेनजित् यास माहीत आहे की अनुपम श्रमण गौतम शाक्य कुळांत प्रव्रजित झाला आहे. वासिष्ठ ! शाक्य लोक कोशलराज प्रसेनजित याच्या अधीन आहेत. शाक्य लोक कोशलराज प्रसेनजित यास नमस्कार करून, अभिवादन करून, प्रत्युत्थान करतात, हात जोडतात अन् सत्कार करतात. वासिष्ठ ! ज्याप्रमाणें शाक्य लोक प्रसेनजितशी व्यवहार करतात, त्याचप्रमाणें प्रसेनजित तथागतांशी व्यवहार करतात. ते काय याचसाठीं की श्रमण गौतम सुजात आहेत. अन् ते स्वत: दुर्जात आहेत ? काय यासाठीं की श्रमण गौतम भारी आहेत अन् ते स्वत: हलके आहेत ? नाहीं. धर्मांमुळेंच सत्कार किंवा गौरव केला-जातो. कोशलराज प्रसेनजित अशा प्रकारें तथागतांस मोठें मानतात अन् त्यांचा सत्कार करतात.”

“वासिष्ठ ! यामुळें ही समजलें पाहिजे की धर्म हाच मानवांत श्रेष्ठ आहे.“

“वासिष्ठ ! नाना जातीचे, नाना गोत्राचे, नाना कुळांतले तुम्हीं इथें येऊन घरदार सोडून प्रव्रजित होता. ‘तुम्हीं कोण आहांत’ असे विचारल्यावर “आम्ही शाक्य पुत्तोय श्रमण” आहोंत असे म्हणता.

वासिष्ठ ! तथागतांबद्दल ज्याच्या मनांत श्रद्धा आहे. असा कोणता ही श्रमण, ब्राह्मण, देव, मार, ब्रह्मा किंवा जगांतल्या कोणत्या ही व्यक्ती-मुळें विचलित होऊं शकणार नाहीं अन् त्याचेच म्हणणे ठीक आहे की मी भगवानांच्या मुखांतून उत्पन्न आहे, धर्मापासून उत्पन्न आहे; धर्मा-नेंच बनलो आहे, धर्माचा उत्तराधिकारी आहे अन् धर्माचा पुत्र आहे. तर, हे सर्व कशासाठीं ? वासिष्ठ ! धर्मकाय, ब्रह्मकाय, धर्मभूत, ब्रह्मभूत ही तथागतांचीच नांवे आहेत.”

# मानव जातिची प्रगति

## प्रलयानंतरची सृष्टी

वासिष्ठ ! बरेच दिवस झाल्यावर, एक वेळ अशी येईल जेव्हां या लोकाचा संवर्त ( प्रलय ) होईल. संवर्त झाल्यावर, लोकांत राहणारे बरें-चशे प्राणी ( सत्व ) आभास्वरांत ( देव ) राहतात. ते तिथें मनोमय, प्रीतिभक्ष, स्वयंप्रभ, आकाशचारी, शुभस्थायी होऊन बरेंच दिवस राहतात. बरेंच दिवस व्यतीत झाल्यावर, एक वेळ अशी येईल जेव्हां या लोकाचा विवर्त्त ( सृष्टि ) होईल. विवर्त झाल्यावर अनेक सत्त्व आभास्वर लोकांतून च्युत होऊन इथें येतात, ते इथें मनोमय, प्रीतिभक्ष्य, स्वयंप्रभ, आकाशचारी, शुभस्थायी होऊन बरेंच दिवस राहतात. त्यावेळीं चहूँकडे पाणीच पाणी असते. सर्वत्र अन्धार पसरला असतो ! चंद्र किंवा सूर्य कांहीच दिसत नाहीं. नक्षत्र किंवा तारे दिसत नाहींत. रात्र किंवा दिवस कळत नाहीं. मास अन् पक्ष कळत नाहीं. ऋतु अन् वर्ष कळत नाहीं. स्त्री अन् पुरुष दिसत नाहींत. 'सत्त्व आहेत' फक्त हीच एक संज्ञा असते.

## मानवाचा प्रारंभिक आहार

तेव्हां, हे वासिष्ठ ! बरेंच दिवस झाल्यानंतर, त्या सत्त्वांसाठीं पाण्यावर, ऊन दूध थंड झाल्यावर जशी साय जमते, तसेंच त्यावर रसा पृथ्वी पसरली. ती वर्ण संपन्न, गन्ध-सम्पन्न, अन् रस सम्पन्न होती. तसेंच, ज्याप्रमाणें लोणी घृतसंपन्न असते. ज्याप्रमाणें मधमाशांचा मधु निर्दोष असतो त्याप्रमाणेंच तिचा स्वाद होता.

वासिष्ठ ! तेव्हां,कांही सत्त्व लोभी होते.'अरे हे काय ?' असा विचार करून ते रसा पृथ्वीस बोटानें चाटूं लागले. त्यामुळें, त्यांस तृष्णा उत्पन्न झाली. इतर सत्व ही त्या सत्त्वाची कृती पाहून रसा पृथ्वीस बोटानें चाटूं लागले. त्यांना ही तृष्णा उत्पन्न झाली.

वासिष्ठ ! तेव्हां ते सत्व हातानें रसा पृथ्वीस, ग्रास करून खाऊं लागले. ते खाल्यामुळें, त्या सत्त्वांची स्वाभाविक प्रभा अंतर्धान झाल्यानें चंद्र अन् सूर्य प्रकट झाले. रात्र अन् दिवस दिसूं लागल्यामुळें मास अन् पक्ष दिसूं लागले. मास अन् पक्ष माहीत झाल्यामुळें ऋतु अन् वर्ष प्रकट झाले. वासिष्ठ ! अशा प्रकारें लोकाचा विवर्त्त (सृष्टि) होतो.

ते सत्त्व रसा पृथ्वीस बऱ्याच दिवस पावेतों खात राहिले, तसतसे, त्यांचे शरीर कर्कश होऊं लागले. त्यांचा वर्ण विकारयुक्त दिसूं लागला. कांही सत्त्व सुन्दर होते तर कांही कुरूप ! जे सत्त्व सुन्दर होते ते स्वतःस कुरूप सत्वांपेक्षां श्रेष्ठ समजत—आम्हीं त्यांच्यापेक्षां सुन्दर आहोंत. आमच्यापेक्षां हे लोक कुरूप आहेत. त्यांचा स्वतःचा, वर्णाबद्दल अभिमान झाल्या कारणानें रसा पृथ्वी अंतर्धान झाली. रसा पृथ्वी अंतर्धान झाल्यावर ते सत्त्व एकत्र होऊन ओरडूं लागले–'अहो रस ! अहो रस !! अजून ही जेव्हां मानवास एखादी सुरस, वस्तू प्राप्त होते, तेव्हां ते म्हणतात—'अहो रस ! अहो रस !!' ते अजून ही त्या प्राचीन गोष्टीचे स्मरण करतात, परंतु त्यांचा अर्थ समजत नाहीं.

तेव्हां, हे वासिष्ठ ! त्या प्राण्यांसाठीं रसा पृथ्वी अन्तर्हित झाल्यावर अहिच्छत्रक ( नागफणी ) सारखी भूमी पापडी प्रमाणें प्रकट झाली. ती वर्ण संपन्न, गन्ध संपन्न अन् रस संपन्न होती. ज्याप्रमाणें लोणी घृत सम्पन्न असते. ज्याप्रमाणें मधमाशांचा मधु निर्दोष असतो तसा त्याचा स्वाद होता. वासिष्ठ ! तेव्हां ते सत्त्व त्या भूमीची पापडी खाऊं लागले. ते बऱ्याच दिवस पावेतो ती पापडी खात राहिले. त्या सत्वांचे शरीर अधिकाधिक कर्कश होऊं लागले, त्यांच्या वर्णांत विकार येऊं लागला. त्यांच्या स्वतःच्या वर्णाबद्दलच्या अभिमानानें भूमीची पापडी अंतर्धान झाली.

तेव्हां हे वासिष्ठ ! ती अंतर्धान झाल्यावर भद्रलता ( एक स्वादिष्ट

लता ) प्रकट झाली, ज्याप्रमाणें कलम्बुक प्रकट होतो. ती सुन्दर होती अन् मधाप्रमाणें मधुर होती.

वासिष्ठ ! तेव्हां ते सत्त्व, भद्रलतेस खाऊं लागले. बरेच्च दिवस तेच खात राहिले. त्यांचे शरीर अधिकाधिक कर्कश होऊं लागले. त्यांच्या वर्णांत विकार दिसून येऊं लागला. त्यांच्या वर्णाच्या अभिमानानें, ती भद्रलता अंतर्धान झाली. ती अन्तर्धान झाल्यावर, ते एकत्र होऊन ओरडू लागले—"हाय ! आमची भद्रलता किती चांगली होती !" त्यामुळें, आज ही लोक दुःखांत पडल्यावर असे म्हणतात—"हाय, आमची भद्रलता !" आज ही, दुःखांत पडल्यावर मानव त्या जुन्या गोष्टीची आठवण करतात. मात्र, त्याचा अर्थ त्यांच्या लक्षांत येत नाहीं.

## स्त्री-पुरुष भेद

वासिष्ठ ! तेव्हां, ती भद्रलता अंतर्धान झाल्यावर शेत नांगरल्या-विना धान प्रादुर्भूत झाले. ते तांदुळाचे दाणे सुवासित होते. त्यास ते सायंकाळीं भोजनासाठीं आणत अन् सकाळ पावेतो ते तयार होत असे. ज्यास ते प्रातःकाळी आणत ते सायंकाळी शिजून तयार होत. त्यांत कसर नव्हती. तेव्हां,ते सत्व,ते धान बऱ्याच दिवस पावेतो खात होते. त्यामुळें, त्या सत्त्वांचे शरीर अधिकाधिक कर्कश होऊं लागले. त्यांच्या वर्णांत विकार दिसूं लागला. स्त्रियांत स्त्री लिंग अन् पुरुषांत पुरुष-लिङ्ग उत्पन्न होऊं लागलें. स्त्री, पुरुषांकडे वारंवार पाहूं लागली अन् पुरुष स्त्रीकडे पाहूं लागला. परस्पर दृष्टिक्षेप झाल्यानें राग उत्पन्न झाला. शरीरांत प्रेमाचा दाह उत्पन्न झाला. त्यामुळें त्यांनी मैथुन केले. वासिष्ठ ! त्यासमयीं जर कुणी कुणास मैथुन करतांना पाही तर तो त्यांच्यावर धूळ फेंकी किंवा चिखल उडवी अन् कोणी शेण फेंकी "दूर हट वृषली ! एक सत्त्व दुसऱ्या सत्त्वाशीं असें करील !" म्हणून, आज ही कांहीं-कांही देशांत नववधूस

सासरी घेऊन जातांना धूळ फेंकतात. हे त्या जुन्या गोष्टीच्या स्मरणार्थ आहे, परंतु त्याचा अर्थ त्यांना कळत नाहीं.

वासिष्ठ! त्यावेळीं जो अधर्म समजला जात असे, तोच आज धर्म मानला जातो. वासिष्ठ! जे सत्त्व त्यावेळीं मैथुन कर्म करीत असत ते तीन मास किंवा दोन मास पावेंतो गांवात येऊं शकत नसत. त्यावेळीं त्यांचा अधःपात होत होता. अधर्मांत पतित झाले होते, तोच अधर्म लपविण्यासाठीं ते घरें तयार करून त्यांत राहू लागले.

## वैयक्तिक सम्पत्तिचा प्रारंभ

वासिष्ठ! तेव्हां कोणा आळशाच्या मनांत आले—'सकाळ संध्याकाल धान आणण्याचा कष्ट कशाला? एकदांच सकाळ संध्याकाळचे खाणें आणले तर?' तेव्हां तो प्राणी एकाच वेळीं-दोन्हीं वेळच्या खाण्यासाठीं धान आणूं लागला. मग कुणी दुसरा प्राणी त्या प्राण्याजवळ येऊन म्हणाला, "चला, आपण धान आणण्यासाठीं चलूं या! हे सत्त्व! आम्हीं एकाच वेळीं दोन्ही वेळच्या खाण्यासाठीं धान आणले आहेत."

तेव्हां हे वासिष्ठ! त्या सत्वानें ही पहिल्या सत्वाप्रमाणें एकदांच धान आणले—'हे तर फार चांगले झाले' त्यानें विचार केला. वासिष्ठ! तेव्हां कुणीतरी प्राणी, तो पुरुष जिथें होता तिथें जाऊन म्हणाला "चल, धान आणण्यासाठीं चलूं या! हे सत्त्व! आम्हीं एकदांच दोन्हीं वेळेसाठीं धान आणलें आहेत.' वासिष्ठ! तेव्हां तो सत्व ही त्यांचे बघून एकाच वेळीं, चार दिवस पुरेल इतके धान घेऊन आला अन् 'हे तर फार चांगले झाले' असा विचार करूं लागला. अशा प्रकारे एकमेकांचे पाहून, ते आठ दिवसांसाठी धान आणूं लागले.

तेव्हांपासून, ते प्राणी धान एकत्र आणून खाऊं लागले. तेव्हांपासून तांदुळावर भुशी होऊं लागली. तेव्हां, फक्त एक जागून खणल्या मुळें ती

जागा रिकामी दिसूं लागली. धानाचे शेत खण्ड-खण्ड दिसूं लागले.

वासिष्ठ ! तेव्हां ते सत्त्व एकत्र होऊन ओरडूं लागले—'आमच्यांत पापधर्म प्रकट होत आहेत. पूर्वी, आम्ही मनोमय होतो. बऱ्याच दिवस पावेतों जगत होतो. बरेच दिवस झाल्यानंतर, जलांत रसा पृथ्वी उत्पन्न झाली. ती वर्ण संपन्न होती. त्या रसा पृथ्वीस आम्हीं खाऊं लागलो अन् आमची स्वाभाविक प्रभा अन्तर्धान झाली. ती अंतर्धान झाल्यामुळें चन्द्र, सूर्य, नक्षत्र अन् तारे, रात्र अन् दिवस, मास-पक्ष, ऋतु-वर्ष दिसूं लागले. रसा पृथ्वीस आम्हीं बऱ्याच दिवस पावेतो खात होतो. तेव्हां, आमच्यांत पाप अकुशल धर्म प्रादुर्भूत झाल्यानें रसा पृथ्वी अंतर्धान झाली. ती अंतर्धान झाल्यावर भूमीत पापुद्रे उत्पन्न झाले ते आम्हीं खात होतो. पापाचा प्रादुर्भाव झाल्याकारणानें ती पापडी अंतर्धान झाली. भद्रलता पण अंतर्धान झाली. आमच्या पापामुळें, तांदुळावर ही भुशी उत्पन्न झाली. आपण धानाची शेतें वाटून घेऊं या अन् त्यांची सीमा बांधून घेऊं या. तेव्हां त्यांनी शेतें वाटून घेतली अन् त्यांची सीमा निर्धारित केली.

वासिष्ठ ! तेव्हां कुणी लोभी, आपल्या भागाची रक्षा करी अन् दुसऱ्यांचा भाग चोरून खाई. त्यास लोकांनी पकडले. त्यास म्हटले—"हे सत्त्व ! तूं दुसऱ्याचा भाग खाऊन पाप कर्म करतोस. पुन्हां असे करूं नकोस." 'ठीक आहे' असे त्या सत्वानें उत्तर दिले. दुसऱ्या वेळीं ही तो दुसऱ्याचा भाग चोरून खाऊं लागला. लोकांनी त्यास पकडले. तिसऱ्या वेळी ही त्यानें तसेंच केले अन् लोकांनी पुनः त्यास पकडले. मग कोणी त्यास हातानें तर कुणी काठीनें मारूं लागला. वासिष्ठ ! तेव्हां पासूंनच चोरी, निन्दा, मिथ्या भाषण अन् दण्ड कर्म होऊं लागले.

वासिष्ठ ! तेव्हां ते प्राणी एकत्र होऊन म्हणूं लागले—प्राण्यांत पापधर्म प्रकट झाले आहेत. ज्यामुळें चोरी, निन्दा, मिथ्या भाषण अन् दण्ड कर्म होत आहेत. तेव्हां आपण अशा एक प्राण्यास निर्वाचित करूं या

जो आमच्या निन्दनीय कर्मांची निंदा करील, आम्हांस उचित कर्त्तव्य सांगेल अन् जो निष्कासन योग्य असेल त्याचे निष्कासन करेल. आम्हीं त्यास धान्याचा कांही भाग देऊं.

## क्षत्रियांची उत्पत्ति

"वासिष्ठ ! तेव्हां ते प्राणी, त्यांत जे सुन्दर, दर्शनीय, प्रासादिक अन् महाशक्तिशाली होते त्यांच्याजवळ जाऊन म्हणाले, 'हे सत्व, उचित अनुचित यांचे नीट प्रकारें अनुशासन करून, निन्दनीय कर्मांची निन्दा करा, उचित कर्मांचा निर्देश करा, जो काढण्या सारखा आहे त्याचे निष्कासन करा. आम्हीं तुम्हाला धान्याचा कांहीं भाग देऊं'. 'ठीक आहे' असे म्हणून त्यांनी ते कर्म स्वीकार केले. तो नीटपणें अनुशासन करी. लोक त्यास धान्याचा भाग देत असत. वासिष्ठ ! महाजनां द्वारा सम्मन्न झाल्या कारणानें 'महासम्मन' हे त्यांचे पहिले नांव पडले. क्षेत्रांचा अधिपति असल्या कारणानें 'क्षत्रिय' हे त्यांचे दुसरे नांव पडले. धर्मानें दुसऱ्यांचे रंजन करी त्यामुळें 'राजा' हे त्यांचे तिसरे नांव पडले."

"वासिष्ठ ! अशा प्रकारें जुन्या अग्रगण्य अक्षरापासून या क्षत्रिय मंडळाचा निर्माण झाला. त्याच पुरुषांचा, इतरांचा नव्हे. धर्मानें, न की अधर्मानें. वाशिष्ठ ! मानवांत धर्म हाच श्रेष्ठ आहे. या जन्मांत देखील अन् परजन्मांत ही !"

## ब्राह्मणांची उत्पत्ति

त्याच प्राण्यांत, कांही लोकांच्या मनांत असा विचार आला, "प्राण्यांत पाप धर्म होऊं लागले—चोरी, निन्दा, असत्य अन् दण्डकर्म यांचा आविष्कार झाला. तेव्हां आपण पापधर्माचा त्याग करूं या. लोकांनी पाप अकुशल धर्मांचा बाह (त्याग) केला. म्हणून 'ब्राह्मण' हे त्यांचे पहिले नांव पडले. ते जंगलांत पर्णकुटीं तयार करून तिथेंच राहत. त्यांच्या जवळ न अग्नि होता, न धूर होता न मुसळ होते. ते

सायंकाळच्या भोजनासाठीं सायंकाळीं अन् सकाळच्या भोजनासाठीं सकाळीं गांवांत जात अन् राजधानींत जात. भोजन करून जंगलांत आपल्या कुटींत येऊन ते ध्यान करीत असत. त्यांना पाहून मानव म्हणाले—"हे सत्त्व जंगलांत पर्णकुटी तयार करून त्यांत ध्यान करीत बसतात. यांच्या जवळ अग्नि नाहीं, धूर नाहीं अन् मुसळ ही नाहीं. जगलांत पर्णकुटी तयार करून हे ध्यान करतात." त्यामुळें त्यांचे दुसरे नांव 'ध्यायक' पडले. वासिष्ठ ! त्या सत्त्वांपैकीं कांहीं, जंगलांत पर्णकुटी तयार करून, ध्यान पूर्ण न झाल्यामुळें ग्राम किंवा निगमच्या आसपास येऊन ग्रंथ तयार करीत राहूं लागले. त्यांना पाहून लोक म्हणाले—"हे ग्रन्थ तयार करीत राहतात. ध्यान करीत नाहींत." त्यामुळें, 'अध्यापक' हे तिसरे नांव पडले. वासिष्ठ ! त्यावेळीं तो नीच समजला जात असे परंतु आज तोच श्रेष्ठ मानला जातो.

वासिष्ठ ! अशा प्रकारें या ब्राह्मण मंडळाचा जुन्या अग्रगण्य अक्षरानें निर्माण झाला. त्याच प्राण्यांचा, इतरांचा नव्हे. अन् तो ही धर्मानें, अधर्माने नव्हे ! वासिष्ठ ! धर्म हाच मनुष्यांत श्रेष्ठ आहे. या जन्मांत देखील अन् परजन्मांत ही.

## वैश्यांची उत्पत्ति.

वासिष्ठ ! त्याच प्राण्यांत कित्येक, मैथुन कर्म करून नाना व्यवसायांत लागले. वासिष्ठ ! मैथुन कर्म करून नाना व्यवसायांत पडल्या कारणानें त्यांचे नांव 'वैश्य' हे पडलें. वासिष्ठ ! या वैश्यमंडळाचे नांव जुन्या अग्रगण्य अक्षराने पडले. वासिष्ठ ! धर्म हाच मानवांत श्रेष्ठ आहे.

## शूद्रांची उत्पत्ति

वासिष्ठ ! त्याच प्राण्यांत जे प्राणी वाचले ते क्षुद्र आचार करणारे प्राणी होते. क्षुद्र आचार केल्यामुळें 'क्षुद्र' अक्षरा ची उत्पत्ति झाली.

वासिष्ठ ! अशा प्रकारें शूद्र मंडळाचे ही जुन्या अग्रगण्य अक्षरानें नामकरण झाले. वासिष्ठ ! धर्मच मानवांत श्रेष्ठ आहे.

## श्रमणांची उत्पत्ति

वासिष्ठ ! एक समय असा होता, जेव्हां क्षत्रिय देखील 'मी श्रमण होईन' असा विचार करी अन् आपल्या धर्माची निंदा करून, घर-दार सोडून प्रव्रजित होत असे. ब्राह्मण, शूद्र अन् वैश्य ही असे करीत. वासिष्ठ ! याच चार मंडळांतून श्रमण मंडळाची उत्पत्ति झाली, त्याच प्राण्यांची, इतरांची नव्हे. अन् ती ही धर्मानें न की अधर्मानें. वासिष्ठ ! धर्म, हाच मानवांत श्रेष्ठ आहे.

## जन्म नाहीं, कर्म प्रधान

वासिष्ठ ! क्षत्रिय देखील, काय वचन अन् मनाने दुराचार करणारे, असत्य धारणा करणारे असले अन् असत्य धारणेच्या अनुकूल आचरण करतात अन् अशा प्रकारें मेल्यावर दुर्गतीस प्राप्त होऊन नरकांत उत्पन्न होतात. ब्राह्मण ही, वैश्य ही अन् श्रमण देखील. वासिष्ठ ! क्षत्रिय देखील, कायेनें सदाचार करून, सत्य धारणा करणारे असले तर, ते मेल्यावर सुगतीस प्राप्त होऊन स्वर्गांत उत्पन्न होतात. ब्राह्मण ही, वैश्य ही, शूद्र ही अन् श्रमण देखील.

वासिष्ठ ! क्षत्रिय देखील कायशून्य, वचनशून्य, मनानें दोन्ही प्रकारचे कर्म करून, मिश्रित दृष्टी ठेवून, मिश्रित दृष्टीयुक्त कर्म करून, काया सोडून मेल्यानंतर सुख-दुःख दोन्हीं भोगतात. ब्राह्मण देखील, वैश्य देखील, शूद्र देखील अन् श्रमण देखील !

वासिष्ठ ! क्षत्रिय देखील काय, वचन अन् मनापासून संयमित होऊन सदतीस बोधि-पाक्षिक धर्मांची भावना करून याच लोकांत निर्वाण प्राप्त करतात. ब्राह्मण ही, वैश्य ही, शूद्र ही अन् श्रमण देखील.

वासिष्ठ ! याच चार वर्णांत, जो भिक्षु अर्हत्, क्षीणाश्रव, ब्रह्मचर्य समाप्त केलेला, कृतकृत्य, भारमुक्त, परमार्थप्राप्त, भव-बंधनरहित, ज्ञानी अन विमुक्त असतो, तोच त्यांत श्रेष्ठ समजला जातो. धर्माने, अधर्माने नव्हे. वासिष्ठ ! धर्म हाच मानवांत श्रेष्ठ आहे. या जन्मांत देखील अन् परजन्मांत ही.[८]"

—:०:—

८—दीघ निकाय—३, ४.

# ब्राह्मणांनी अनधिकार चेष्टा केली

## चार सेवा धर्म अन् चार स्वधन व्यर्थ आहेत

'हे गौतम ! ब्राह्मण चार प्रकारचे सेवाधर्म ( परिचर्या ) सांगतात. ते ब्राह्मणाची परिचर्या सांगतात, क्षत्रियांची परिचर्या सांगतात, वैश्यांची परिचर्या सांगतात अन् शूद्रांची परिचर्या सांगतात. ते सांगतात की क्षत्रियांनी ब्राह्मणांची सेवा करावी, वैश्यांनी अन् शूद्रांनी ही हे गौतम, ब्राह्मण क्षत्रियांची परिचर्या अशा प्रकारे वर्णन करतात—"वैश्यांनी वैश्यांची सेवा करावी, शूद्रांनी ही वैश्यांची सेवा करावी. हे गौतम, ब्राह्मण शूद्रांची परिचर्या अशा प्रकारे सांगतात—शूद्रांनीच शूद्रांची सेवा करावी. हे गौतम, या बद्दल आपले काय म्हणणें आहे ?"

"काय ब्राह्मण, सर्व जग ब्राह्मणांस याची अनुज्ञा देतात की या चारी परिचर्यांचे त्यांनी प्रज्ञापन करावे ?"

"नाहीं, हे गौतम !"

"ज्याप्रमाणें ब्राह्मण, कुणी धन-रहित, दरिद्र पुरुष इच्छा रहित असून ही, त्याच्यासाठीं एक भाग ठेवून दिला जावा—हे पुरुष, हे तुमच्या खाण्यासाठीं मांस आहे अन् याची किंमत तुम्हीं द्या. या प्रकारें ब्राह्मण, जगांतील अन्य श्रमण, ब्राह्मणांची अनुज्ञा न घेतांच चार परिचर्यांचे प्रज्ञापन करतात. ब्राह्मण, मी सर्वच परिचर्यांचे सेवन करावयास म्हणत नाहीं अन् परिचर्येमुळें अहित होते, हित होत नाहीं, त्यास मी सेवनीय म्हणत नाहीं. ज्याचे परिचरण करतात, ज्या परिचर्येमुळें हित होते, अहित होत नाहीं, त्यास मी सेवनीय म्हणतो, ब्राह्मण अन् क्षत्रियांस देखील विचारा—ज्याचे परिचरण करतात, ज्या परिचर्येमुळें तुझें हित होते, अहित नाहीं—या दोघांत तूं कसले परिचरण करशील ?

तो ब्राह्मण किंवा क्षत्रिय ही ठीक हेच उत्तर देईल—जी परिचर्या केल्याने अहित होईल, हित होणार नाहीं, त्याचें परिचरण मी करणार नाहीं. ज्या परिचर्येंमुळें हित होईल, अहित नाहीं, त्याचे मी परिचरण करणार नाहीं. ब्राह्मणांनी ब्राह्मणांस विचारावे, वैश्यांस ही अन् शूद्रांस ही.

( १ ) ब्राह्मण, मी उच्च कुळांत जनमल्यास श्रेय-हित ( चांगले ) म्हणत नाहीं, न उच्च कुलीनतेस वाईट ही म्हणतो. ( २ ) ब्राह्मण, मी उदार वर्णतेस ( उच्च वर्णांत उत्पन्न होणें किंवा उच्च रंगाचा होणें ) श्रेय म्हणत नाहीं, न तर मी उदार वर्णतेस पापीच समजतो (३) ब्राह्मण, मी न तर उदार भोगांस ( अधिक, धन-धान्य संपन्न होणें ) श्रेय मानतों अन् न तर उदार भोगांस पापीय ( वाईट ) म्हणतो.

ब्राह्मण, उच्च कुलांत उत्पन्न होऊन ही कुणी-कुणी हिंसक होतात. चोर, काम भोगांत मिथ्या आचरण करणारे, खोटे, चुगल्या करणारे, कटु-भाषी, बडबडे, लोभी, द्वेषी, खोटी धारणा करणारे असतात याच-साठीं, मी उच्च कुलीनतेस श्रेय म्हणत नाहीं. उच्च कुलीन देखील अहिं-सक असतो, चोरी न करणारा असूं शकतो, काम भोगांत, मिथ्या आचारां पासून विरत असतो, खोटें बोलण्यापासून विरत असतो, बडबडीपासून विरत असतो, अद्वेषी अन् खरी धारणा करणारा असतो. याच्चसाठीं, ब्राह्मण मी उच्च कुलीनतेस पापी म्हणत नाहीं.

ब्राह्मण, उदार वर्णवाले ही, कुणी-कुणी हिंसक, चोर, काम भोगांत मिथ्या आचार करणारे, खोटे, चहाडखोर, कटुभाषी, बडबडे, लोभी, द्वेषी अन् खोटी धारणा करणारे असतात. ब्राह्मण, अन् उदार वर्णीय ही कुणी-कुणी अहिंसक, चोरीपासून विरत, कामभोगांत मिथ्या आचार करण्यापासून विरत, खोटें न बोलणारे, चहाडी न करणारे, कटु वचना-पासून विरत, बडबड न करणारे, अलोभी, अद्वेषी, अन् सत्य धारणा करणारे असतात. ब्राह्मण, उदार भोगवाले ही तसेंच. यासाठीं, मी उदार वर्णतेस पापीय म्हणत नाहीं.

ब्राह्मण, न तर मी सर्व लोकांस परिचरणीय ( सेवनीय ) म्हणतो, अन् न तर अपरिचरणीय. ब्राह्मण, ज्याचे परिचरण करतात, परिचर्येंसाठीं श्रद्धा वाढते, शील ( सदाचार ) वाढतो, ज्ञान ( श्रुत ) वाढते, त्याग वाढतो, त्यास मी परिचरणीय म्हणतो."

असे म्हटल्यावर एसुकारि ब्राह्मण भगवानांस म्हणाले, "हे गौतम! ब्राह्मण चार प्रकारच्या धनांची व्याख्या करतात—( १ ) भिक्षाचर्येंस ब्राह्मण आपले धन म्हणतात. भिक्षाचर्येंस अतिक्रमण करणारा ब्राह्मण न देणाऱ्यांप्रमाणें ग्वाल्याप्रमाणें अकृत्यकारी होतो. हे गौतम! ब्राह्मण यांस आपले स्वधन मानतात.

( २ ) हे गौतम! ब्राह्मण धनु-कलापास ( शस्त्र-शिल्प ) क्षत्रियांचे स्वधन म्हणतात. धनु कलाप रूपी स्वधन याचे अतिक्रमण करणारा अकृत्यकारी असतो.

( ३ ) शेती अन् गो-पालन हे वैश्यांचे स्वधन म्हटले जाते.

( ४ ) लाकूड तोडणें, परिवहन करणें यास शूद्रांचे स्वधन म्हटले जाते. लाकूड तोडणें, परिवहन करणें आदि रूपी स्वधनांस अतिक्रमण करणारा शूद्र न देतां घेणाऱ्या ग्वालाप्रमाणें अकृत्यकारी असतो. ९

"इथें, गौतम आपण काय म्हणतां?"

"हे ब्राह्मण! काय, सर्व जग ब्राह्मणांस या गोष्टीची अनुज्ञा देते की त्यांनी या चार स्वधनांचे प्रज्ञापन करावे?"

---

९—यजुर्वेदांत देखील आले आहे—

"ब्रह्मणे ब्रह्मणं, क्षत्रायराजन्यं, मरुद्भयो वैश्यं, तपसे शूद्रं, तमसे तस्करं, नारकाय वीरहणं पाप्मने क्लीवं, आक्रयाय अयोगूं, कामाय पुंश्च, लूं अतिक्रुष्टाय मागधम्।"

३

"नाहीं, गौतम !"

"ज्याप्रमाणें कोणीं धन-रहित, दरिद्र पुरुष, इच्छा रहित असतां ही त्याच्यासाठीं एक भाग लावून दिला जावा की हे पुरुष !—हे तुझ्या खाण्यासाठीं मांस ठेवले आहे अन् याची किंमत तूंच द्यावीस ! त्याच-प्रमाणें, हे ब्राह्मण ! जगांतील अन्य श्रमण ब्राह्मणांची अनुज्ञा न घेतां ब्राह्मण या चार धनांचे प्रज्ञापन करतात."

## चारी वर्ण समान आहेत

"हे ब्राह्मण ! मी सर्वोत्तम आर्यधर्मास, पुरुषाचे स्वधन प्रज्ञापन करतो. हे ब्राह्मण ! माता-पितांच्या जुन्या कुलवंशाचे अनुस्मरण करून, जेव्हां या पुरुषाचा जन्म होतो, तेव्हांच त्याची संज्ञा ब्राह्मण होते. क्षत्रिय कुळांत उत्पन्न झाल्यास 'क्षत्रिय' ही त्याची संज्ञा होते अन् ब्राह्मण, वैश्य अगर शूद्र कुळांत उत्पन्न झाल्यास, ब्राह्मण, वैश्य अन् शूद्र ही संज्ञा होते. जो जो प्रत्यय घेऊन अग्नि जळतो त्यास काष्टाग्नि ही संज्ञा मिळते. याच प्रकारें, हे ब्राह्मण ! मी सर्वोत्तम आर्यधर्मास पुरुषाचे स्वधन-प्रज्ञापन करतो जिथें त्याचा जन्म होतो, तीच त्याची संज्ञा बनते.

हे ब्राह्मण ! क्षत्रिय कुळांत ही जर कोणी घरदार सोडून प्रव्रजित होतो अन् तथागतांनी सांगितलेल्या धर्माचे आचरण करून हिंसेपासून विरत होतो, सम्यक् दृष्टि ( खरी धारणारा ठेवणारा ) ठेवतो, तो न्याय निर्वाणाची आराधना करणारा होतो. हीच स्थिती ब्राह्मण कुळांत, वैश्य कुळांत अगर शूद्र कुळांत उत्पन्न होणाऱ्यांची असते."

"तर, काय मानतोस ? काय फक्त ब्राह्मणंच या प्रदेशांत वैर-रहित, द्वेष-रहित, मैत्री-चित्त भावना व्यक्त करूं शकतो ? क्षत्रिय किंवा वैश्य करूं शकत नाहीं ?"

"असे नाहीं, गौतम ! क्षत्रिय देखील, या प्रदेशांत वैर-रहित, द्वेष-रहित, मैत्री-चित्त भावना व्यक्त करूं शकतात.

"याच प्रकारें, हे ब्राह्मण ! क्षत्रिय कुळांत ही जर कुणी घरदार सोडून प्रव्रजित होता, तर तो निर्वाणाची आराधना करणारा म्हणवितो. त्याचप्रमाणें, ब्राह्मण कुळांत, वैश्य-कुळांत अन् शूद्र कुळांत उत्पन्न होणाऱ्यांची स्थिती होते."

"मग काय म्हणतोस, हे ब्राह्मण ! काय ब्राह्मणंच स्नान-चूर्णाचे पिण्ड घेऊन नदीवर जाऊन मळ धुवूं शकतो ? क्षत्रिय, वैश्य अन् शूद्र नाहीं ?

"नाहीं, हे गौतम ! क्षत्रिय, वैश्य अन् शूद्र देखील स्नान चूर्णाचे पिण्ड घेऊन नदीवर जाऊन मळ धुवूं शकतो."

"त्याचप्रमाणें, हे ब्राह्मण ! क्षत्रिय कुळांत जर कुणी घरदार सोडून प्रव्रजित होतो, तर तो निर्वाणाची आराधना करणारा म्हणवितो. त्याचप्रमाणें, ब्राह्मणकुळांत, वैश्य कुळांत अन् शूद्र कुळांत उत्पन्न होणाऱ्यांची स्थिती आहे."

"तर, काय म्हणतोस हे ब्राह्मण ! जर इथें, अभिषेक प्राप्त कुणी क्षत्रिय राजा नाना जातींच्या शंभर पुरुषांस एकत्र करून त्यांना असे म्हणेल—'आपण सर्व इथें या, अग्नि तयार करा, तेज प्रादुर्भूत करा', तर काय त्या अग्नीनें विस्तवाचे काम घेतां येणार नाहीं ?"

"नाहीं, हे गौतम ! त्या क्षत्रिय कुलोत्पन्न व्यक्तीं द्वारा जो अग्नी तयार केला जाईल, त्या अग्नीत देखील ज्वाळा राहील, त्याने ही अग्नीचे काम घेतां येईल अन् चाण्डाल कुळांत उत्पन्न व्यक्तीं द्वारा जो अग्नि तयार केला जाईल, त्या अग्नीत देखील जाळ राहील. सर्व प्रकारच्या अग्नीने विस्तवाचे काम घेतां येईल."

"अशाच प्रकारें, हे ब्राह्मण! क्षत्रिय कुळांत जर कुणी घरदार सोडून प्रव्रजित होतो तर तो निर्वाणाची आराधना करणारा होतो. ब्राह्मण कुळांत अन् शूद्र कुळांत उत्पन्न होणाऱ्यांची ही तीच स्थिती होते." १०

——:०:——

१०—मज्झिम निकाय २, ५, ६.

# जातिवाद केवळ बन्धन आहे

"अम्बष्ठ ! काय वृद्ध अन् जुन्या आचार्य-प्राचार्यांशी अशाच गोष्टी होतात, जशा तू माझ्याशीं चालतां-फिरतां करीत आहेस ?"

"नाहीं, हे गौतम ! चालणाऱ्या ब्राह्मणांबरोबर चालत, उभ्या ब्राह्मणांबरोबर उभ्या-उभ्या अन् बसलेल्या ब्राह्मणांबरोबर बसून गोष्टी केल्या पाहिजेत. झोंपलेल्या ब्राह्मणांशी झोंपून गोष्टी केल्या जाऊं शकतात. परंतु, हे गौतम ! जो मुण्डक, श्रमण, नीच, काळया, ब्रह्माच्या पायापासून उत्पन्न आहेत, त्यांच्याशीं तशाच गोष्टी होतात जशा माझ्या आपणाशी होतात."

"अम्बष्ठ ! याचकाप्रमाणें तुझें इथें येणे झाले आहे. मनुष्य ज्या अर्थासाठीं येवो, तोच अर्थ मनांत ठेवला पाहिजे. अम्बष्ठ ! असे वाटते की तू गुरुकुलांत वास केला नाहींस. वास न करतांच तू गुरुकुलवासाचा अभिमान करतोस ?"

तेव्हां, अम्बष्ठ माणवकानें, भगवानांनी गुरुकुल अ-वास म्हणतांच कुपित होऊन अन् असंतुष्ट होऊन, भगवानांवरच क्रोधित होऊन, भगवानाची निन्दा करीत, त्यांच्यावर व्यंगोक्ति केली—'श्रमण गौतम दुष्ट आहेत' त्यानें पुढें म्हटले—"हे गौतम ! शाक्य जाति चण्ड आहे. हे गौतम ! शाक्य जाति क्षुद्र आहे. हे गौतम ! शाक्य जाति व्यर्थ बडबड करणारी आहे. नीच असल्या कारणानें शाक्य ब्राह्मणांचा सत्कार करत नाहींत, ब्राह्मणांचा गौरव करत नाहींत, त्यांना मानीत नाहींत, त्यांची पूजा करत नाहींत. हे गौतम ! तर, ते शाक्य अयोग्य आहेत, जे नीचा प्रमाणे शाक्य ब्राह्मणांचा सत्कार करीत नाहींत."

अशा प्रकारें अम्बष्ठानें शाक्यांस नीच म्हणून प्रथम आक्षेप केला.

"अम्बष्ठ ! शाक्यांनी तुझा असा काय अपराध केला आहे ?"

"हे गौतम ! एके काळीं, मी आपले आचार्य, ब्राह्मण पौष्करसाति यांच्या कांही कामानें कपिलवस्तु इथें गेलो अन् जिथें शाक्यांचा संस्थागार ( प्रजातंत्र भवन ) होता, तिथें पोंचलो. त्यावेळीं वरेंचशें शाक्य अन् शाक्यकुमार संस्थागारांत उंच-उंच आसनांवर बसून एक दुसऱ्यांकडे अंगुलीनिर्देश करीत हँसत होते, खेळत होते. जणूं माझ्या-वरंच ते हंसत होते. त्यांच्यापैकीं कोणाही व्यक्तीनें मला आसनावर बसण्यास म्हटले नाहीं तेव्हां, हे गौतम ! हे उचित नव्हे की हे नीच अन् नीच समान शाक्य, ब्राह्मणांचा सत्कार करीत नाहींत."

अशा प्रकारें अम्बष्ठ माणवकानें शाक्यांस नीच म्हणून दुसरा आक्षेप केला.

"हे अम्बष्ठ ! चिमणी हा पक्षी देखील आपल्या घरांत स्वच्छंद आलाप करतो. कपिलवस्तु शाक्यांचे आपले घर आहे, अम्बष्ठ ! लहानशा गोष्टीनें तूं वाईट वाटून घेऊं नकोस."

"हे गौतम ! चार वर्ण आहेत—क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य अन् शूद्र ! यापैकीं, हे गौतम ! क्षत्रिय, वैश्य अन् शूद्र हे तिन्हीं वर्ण ब्राह्मणांचे सेवक आहेत. हे गौतम ! तेव्हां हे उचित नाहीं की शाक्यांनी ब्राह्मणांचा सत्कार करूं नये."

अशा प्रकारें अम्बष्ठ माणवकानें नीच म्हणून शाक्यांवर तिसरा आक्षेप केला.

तेव्हां भगवानांनी अम्बष्ठ माणवकास संबोधित केले—"हे अम्बष्ठ ! जर एक क्षत्रिय कुमार ब्राह्मण कन्येबरोबर सहवास करतो अन् त्यांच्या

सहवासाने पुत्र उत्पन्न होतो, तर क्षत्रिय कुमारापासून ब्राह्मण कन्येस जो पुत्र उत्पन्न झाला तो काय ब्राह्मणांपासून आसन अन् पाणी घेण्याचा अधिकारी होईल ?"

"होय गौतम !"

"काय ब्राह्मण श्राद्ध, भोज, यज्ञ, अन् पाहुणचारांत त्याला आपल्या बरोबर बसवून खायला घालतील ?"

"खायला घालतील, हे गौतम !"

"काय ब्राह्मण त्याच्यापासून मंत्र म्हणवितील ?"

"म्हणवितील, हे गौतम !"

"त्यास ब्राह्मणी मिळविण्यास त्रास होईल की नाहीं ?"

"त्रास होणार नाहीं, गौतम !"

"काय, क्षत्रिय त्यास अभिषेकानें अभिषिक्त करतील ?"

"नाहीं, हे गौतम ! कारण माता ब्राह्मणी असल्या कारणानें तसें ठीक होणार नाहीं."

"तर मग, हे अम्बष्ठ ! जर एक ब्राह्मण कुमार क्षत्रिय कन्येबरोबर सहवास करतो अन् त्यांच्या सहवासानें जो पुत्र उत्पन्न होतो तो पुत्र ब्राह्मणांकडून आसन अन पाणी घेण्याचा अधिकारी होईल ?"

"होय गौतम !"

"काय ब्राह्मण श्राद्ध, भोज, यज्ञ आणि पाहुणचारांत त्याला आपल्या बरोबर खावयास बसवितील ?"

"होय, गौतम !"

"ब्राह्मण त्याजपासून मंत्र म्हणवितील किंवा नाहीं ?"

"मंत्र म्हणवितील, हे गौतम !"

"काय ब्राह्मण स्त्री मिळविण्यास त्यास त्रास पडेल ?"

"नाहीं, हे गौतम !"

"काय, क्षत्रिय त्यास क्षत्रिय अभिषेकानें अभिषिक्त करतील ?"

"नाहीं, हे गौतम !"

"तसे कां ?"

"कारण, हे गौतम ! वडिलांकडून तसें ठीक होणार नाहीं."

"अशा प्रकारें, हे अम्बष्ठ ! स्त्रीच्या बाजूनें किंवा पुरुषाच्या बाजूनें क्षत्रिय हाच श्रेष्ठ आहे अन् ब्राह्मण हीन आहे. तर, हे अम्बष्ठ ! जर ब्राह्मण एखाद्या ब्राह्मणास सुऱ्यानें मुण्डित करून अश्वाच्या चाबकानें मारून त्यास राष्ट्र किंवा नगरांतून हांकलून देईल तर काय तो ब्राह्मणांपासून आसन अन् पाणी मिळविण्याचा अधिकारी होईल ?"

"नाहीं, हे गौतम !"

"काय ब्राह्मण श्राद्ध, भोज, यज्ञ किंवा पाहुणचारांत त्यास आपल्या जवळ बसवून खायला घालतील ?"

"नाहीं, हे गौतम !"

"ब्राह्मण त्याजपासून मंत्र म्हणवितील किंवा नाहीं ?"

"नाहीं, हे गौतम !"

"त्यास ब्राह्मण स्त्री मिळविण्यांत त्रास होईल किंवा नाहीं ?"

"त्रास होईल, हे गौतम !

"तर अम्बष्ठ ! जर क्षत्रिय एका पुरुषास कोणत्या कारणानें, सुऱ्यानें मुण्डित करून, घोड्याच्या चाबकानें मारून राष्ट्र अगर नगरापासून काढून देतील तर काय तो ब्राह्मणापासून आसन अन् पाणी मिळविण्याचा अधिकारी होईल ?"

"होय गौतम !"

"काय ब्राह्मग त्यास श्राद्ध, भोज, यज्ञ अन् पाहुणचारांत आपल्या जवळ बसवून खायला घालतील ?"

"होय, गौतम !"

"काय ब्राह्मण त्याजपासून मंत्र म्हणवितील ?"

"होय गौतम !"

"त्यास स्त्री मिळविण्यांत त्रास होईल किंवा नाहीं ?"

"त्रास होणार नाहीं, हे गौतम !"[११]

"अम्बष्ठ ! क्षत्रिय अत्यंत नीच होऊन राहतो, जेव्हां क्षत्रिय त्यास कोणत्या तरी कारणानें मुण्डित करून नगरापासून बाहेर काढून देतो. अशा प्रकारें, हे अम्बष्ठ ! तो क्षत्रियांत ही परम नीचतेस प्राप्त आहे, तरी ही क्षत्रिय हाच श्रेष्ठ आहे अन् ब्राह्मण हा हीन आहे."

"अम्बष्ठ ! अनुपम विद्याचरण सम्पदेस जातिवाद म्हणत नाहींत, गोत्रवाद म्हणत नाहींत, मानवाद म्हणत नाहींत—'तूं माझ्या योग्य आहेस, किंवा तूं माझ्या योग्य नाहींस.' हे अम्बष्ठ ! जिथें आवाह-त्रिवाह होतो तिथेंच जातिवाद, गोत्रवाद, मानवाद असतो. 'तूं माझ्या योग्य आहेस' अन् 'तूं माझ्या योग्य नाहींस' असें म्हटले जाते. अम्बष्ठ ! जे कुणी जातिवादांत बांधलेले आहेत, गोत्रवादांत बांधलेले

---

११—याच्या विपरीत, महाभारताच्या अनुशासन पर्वांत ४४ व्या अध्यायांत शेवटी हा श्लोक जोडला आहे की ब्राम्हण तिन्हीं वर्णांची कन्या घेऊं शकतो. त्याच्यापासून त्यास जी संतति होईल ती ब्राह्मणंच म्हटली जाईल—

'त्रिषु वर्णेषु जातो हि ब्राह्मणाद् ब्राह्मणो भवेत् ।
स्मृताश्च वर्णाश्चत्वारः पंचमो नाधिगम्यते ॥"

आहेत, अभिमानवादांत बांधलेले आहेत, आवाह-विवाहांत बांधलेले आहेत, ते अनुपम विद्याचरण सम्पदेपासून दूर आहेत. अम्बष्ट! जातिवाद बंधन आहे, गोत्रवाद बंधन आहे, मानवाद बंधन आहे, आवाह-विवाह बंधन आहेत. त्यांचा त्याग करूनच अनुपम विद्याचरण सम्पदेचा साक्षात्कार केला जातो."[१२]

—.०:—

१२—दीघनिकाय १, ३.

# जातिवाद व्यर्थ आहे

"ब्राह्मण ! ब्राह्मण लोक किती अंगांनी युक्त ( गुणांनी युक्त ) पुरुषास ब्राह्मण म्हणतात अन् ते 'मी ब्राह्मण आहे' असे खरें म्हणतात, खोटे नाहीं ?"—भगवानांनी सोणदण्डास प्रश्न केला.

तेव्हां सोणदण्ड ब्राह्मणास असे वाटले की 'अहा!' जे माझे इच्छित, आकांक्षित, अभिप्रेत प्रार्थित होते—अहो वत् ! जर श्रमण गौतमांनी मला माझ्या त्रैवेद्यिक पांडित्याबद्दल प्रश्न केला असता,' तर, श्रमण गौतम मला माझ्या त्रैवेद्यिक पांडित्याबद्दलंच प्रश्न करीत आहेत. मी आपल्या प्रश्नोत्तरानें त्यांचे चित्त अवश्य संतुष्ट करीन. तेव्हां, सोणदण्ड ब्राह्मण उठला अन् परिषदेकडे दृष्टी फेंकीत भगवानांस म्हणाला—

"हे गौतम ! ब्राह्मण लोक पांच अंगांनी ( गुणांनी ) युक्त अशा पुरुषास ब्राह्मण म्हणतात. ते पांच गुण कोणते ?"

(१) ब्राह्मण, माता-पिता दोन्हीं बाजूंनी सुजात असो. (२) अध्यापक (वेदपाठी), मंत्रघट, त्रिवेद पारंगत असो. (३) अभिरूप, दर्शनीय अन् अत्यंत गौरवर्ण युक्त असो. (४) शीलवान (सदाचारी) असो. (५) पण्डित, मेघावी, यज्ञदक्षिणा ग्रहण करणाऱ्यांत प्रथम किंवा द्वितीय असो."

"ब्राह्मण ! या पाँच अंगांपैकीं, काय एक अंग सोडल्यावर चार अंगाने युक्त पुरुष ब्राह्मण म्हटला जाऊं शकतो ?"

"म्हटला जाऊं शकतो, गौतम ! या पाँच अंगापैकीं, हे गौतम ! वर्ण सोडून दिला जाऊं शकतो. वर्ण ( रंग ) काय करील ? जर ब्राह्मण दोन्ही कडून सुजात आहे, अध्यापक, मंत्रघट, शीलवान आहे, पण्डित मेघावी आहे तर या चार गुणांनी युक्त अशा पुरुषास ब्राह्मण लोक ब्राह्मण म्हणतात."

"या चार अंगापैकीं एक अंग सोडल्यास, काय तीन अंगानें युक्त व्यक्तीस ब्राह्मण म्हटले जाऊं शकते ?"

"म्हटले जाऊं शकते, हे गौतम ! या चार अंगापैकीं, हे गौतम ! मंत्रांना सोडतां येऊं शकते. मन्त्र काय करतील ? जर, हे गौतम ! ब्राह्मण दोन्ही बाजूंनी सुजात असेल, शीलवान असेल, पण्डित मेधावी असेल तर या तीन अंगांनी युक्त अशा माणसास ब्राह्मण म्हणतात."

"ब्राह्मण ! काय या तीन अंगापैकीं एक अंग सोडल्यास, दोन अंगानें युक्त अशा व्यक्तीस ही ब्राह्मण म्हणतां येईल ?"

"म्हणतां येईल, हे गौतम ! या तिन्हींपैकीं, हे गौतम ! जातीस सोडले जाऊं शकते. जाति काय करेल ? जर, हे गौतम ! ब्राह्मण शीलवान असेल, पण्डित मेधावी असेल, तर या दोन गुणांनी युक्त अशा व्यक्तीस, हे गौतम, ब्राह्मण म्हणतात !"

असें म्हटल्यावर, त्या ब्राह्मणाने सोणदण्ड ब्राह्मणास म्हटले—"सोण-दण्ड ! आपण असें म्हणूं नका. आपण असे म्हणूं नका सोणदण्ड ! आपण वर्णाचा अपवाद करता, मन्त्रांचा ( वेदाचा ) अपवाद करता, जातीचा अपवाद करता. एक तऱ्हेनें, आपण गौतमांचाच वाद स्वीकार करतां."

तेव्हां भगवान त्या ब्राह्मणांस म्हणाले—

"अहो ब्राह्मण ! आपणांस असे वाटत आहे की सोणदण्ड ब्राह्मण अल्पश्रुत आहे, असुवक्ता आहे, दुष्प्रभ आहे. सोणदण्ड या बाबतीत श्रमण गौतमांशी वाद करूं शकत नाहींत. तर, सोणदण्ड ब्राह्मण थांबला तर तुम्हीं माझ्याशी वाद करा. जर तुम्हांस असे वाटत असेल की सोणदण्ड ब्राह्मण बहुश्रुत आहे, सुवक्ता आहे, पण्डित आहे, तो या गोष्टींत श्रमण गौतमांशी-वाद घालूं शकतो तर तुम्ही थांबा अन् सोणदण्ड ब्राह्मणास माझ्याशी वाद करूं द्या."

असें म्हटल्यावर, सोणदण्ड ब्राह्मणानें भगवानांस म्हटले—

"आपण थांबा गौतम ! आपण मौन धारण करा. मीच यांना धर्मपूर्वक उत्तरें देईन." तेव्हां सोणदण्ड ब्राह्मणानें त्या ब्राह्मणांस म्हटले—

"आपण असें म्हणूं नका की सोणदण्ड वर्णाचा अपवाद करतात. मी वर्ण, मन्त्र किंवा जातीचा अपवाद करत नाहीं."

त्यावेळीं सोणदण्ड ब्राह्मणाचा भाचा अङ्गक माणवक त्या परिषदेंत बसला होता. तेव्हां सोणदण्ड ब्राह्मणानें त्या ब्राह्मणांस म्हटले—

"आपण सर्व, माझा भाचा अङ्गक माणवक यास बघत आहांत ?"

"होय !"

"अङ्गक माणवक अभिरूप, दर्शनीय, प्रासादिक, परम गौरवर्ण, अन् सौंदर्याने युक्त असा आहे. या परिषदेंत श्रमण गौतमांस सोडून वर्णांत त्याच्या सारखा देखणा कोणी ही नाहीं. अङ्गक माणवक वेदपाठी, मन्त्रधर, निघण्टु, कल्प अक्षर प्रभेद सहित तिन्हीं वेदांत आणि पांची इतिहासांत पारंगत आहे. पदक ( कवि ), वैयाकरण, लोकायत महापुरुष लक्षणशास्त्रांत ही तो निपुण आहे. मीच त्याला मंत्रांचा पाठ दिला आहे. अङ्गक माणवक दोन्हीं बाजूंनी सुजात आहे. मी त्याच्या माता-पितांस उत्तम प्रकारे जाणतो. जर अङ्गक माणवक हिंसा करील, चोरी करील, पर-स्त्री गमन करील, खोटे बोलेल, दारूचे सेवन करेल तर तिथें जाति काय करेल ? जेव्हां ब्राह्मण ( १ ) शीलवान असतो ( २ ) पण्डित अन् मेधावी असतो, यज्ञ दक्षणा ग्रहण करणाऱ्यांत प्रथम किंवा द्वितीय असतो तेव्हां या अंगांनी युक्त अशा व्यक्तींस ब्राह्मण म्हणतात. तो 'मी ब्राह्मण आहे' हे खरेंच सांगतो, खोटे सांगत नाहीं."[१३]

———

१३—दीघनिकाय १, ४.

# पांच प्रकारचे ब्राह्मण

"हे गौतम ! मी ऐकले आहे—श्रमण गौतम वृद्ध, जुने, आयु ढळलेल्या अन् प्रौढ ब्राह्मणांस न तर अभिवादन करतात, न प्रत्युत्थान करतात अन् न तर आसनावर आमंत्रित करतात. तेव्हां, हे गौतम ! काय हे ठीक आहे की गौतम ब्राह्मणांस अभिवादन करत नाहींत ? तेव्हां, हे गौतम ! हे उचित नाहीं."

"द्रोण ! तूं देखील ब्राह्मण होण्याचा अभिमान करतोस ?"

"हे गौतम ! ब्राह्मण तो आहे, जो दोन्हीं कडून सुजात असेल. आई कडून देखील विशुद्ध, पिताकडून देखील विशुद्ध, पितामह मातामहच्या सात पिढयांपावेतो जातिपासून अपतित, अनिन्दित असेल, अध्यायी, मंत्रधर, निघण्टु, कल्प-अक्षर प्रभेद सहित तिन्हीं वेदांत अन् इतिहासांत पारंगत असेल, पदक ( कवि ), वैयाकरणी असेल, लोकायत महापुरुष अन् लक्षण शास्त्रांत निपुण असेल. तेव्हां, तो ठीक बोलून मलाच ब्राह्मण म्हणेल. हे गौतम ! मी ब्राह्मण आहे. दोन्हीं कडून सुजात आहे. माता-पिता अन् दोन्हीं कडल्या पितामहांच्या सात पिढ्यांपावेतो, मी अध्यायी, मंत्रधर, अन् तिन्हीं वेदांत पारंगत आहे."

"द्रोण ! तुझ्या पूर्वचे ऋषि, मंत्रांचे कर्त्ता, मंत्रांचे प्रोक्ता होते. त्यांच्या जुन्या मंत्रपदांस आजकालचे ब्राह्मण गीताप्रमाणें गान करतात, स्वाध्याय केल्याप्रमाणें स्वाध्याय करतात, वाचलेल्या प्रमाणें वाचतात, जसे अट्टक वामक, वामदेव, विश्वामित्र यमदग्नि, अंगिस, भारद्वाज, वासिष्ठ, काश्यप, भृगु[१४]—त्यांनी पांच प्रकारच्या ब्राह्मणांची व्याख्या केली आहे—( १ ) ब्रह्मसम, ( २ ) देवसम ( ३ ) मर्याद ( ४ )

संभिन्न मर्याद ( ५ ) ब्राह्मण चाण्डाल. द्रोण, तू कोणता ब्राह्मण आहेस ?"

"हे गौतम ! जेव्हां आम्हांस या पांच ब्राह्मणांबद्दल कांहींच माहीत नाहीं,तेव्हां आम्हीं कोणते ब्राह्मण आहोंत हे कसे माहित होईल ? गौतम ! आपण धर्मोपदेश करा, ज्यानें आम्हीं या पांच ब्राह्मणांबद्दल माहिती मिळवूं शकूं !"

"तेव्हां, हे ब्राह्मण ! ऐक, मी सांगतो ते नीट प्रकारें धारण कर."

"फार छान !"

"हे द्रोण ! ब्राह्मण ब्रह्मसम कसा असतो ? इथें, हे द्रोण ! ब्राह्मण दोन्हीं कडून सुजात असतो—माताकडून देखील अन् पिताकडून देखील, माता-पिता दोन्हीं कडल्या पितामहांच्या सात पिढ्यांपावेतो. तो अठ्ठे-चाळीस वर्षं पावेतो, मंत्रांचे पठन करीत कौमार्य ब्रह्मचर्य धारण करून, मंत्रांचे पठन करीत आचार्यांसाठीं आचार्यधन ( गुरुदक्षिणा ) शोधत असतो. धर्मानें, अधर्माने नव्हे. द्रोण ! धर्म काय आहे ? कृषिने नव्हे, व्यापारानें नव्हे, गोपालनाने नव्हे, बाण अस्त्राने नव्हे, राजपुरुषतेने ( सरकारी नोकरी ) नव्हे, कोणत्याही शिल्पाने नव्हे, भिक्षा पात्राचे अतिक्रमण न करतां केवळ भिक्षाचर्येने तो आचार्यास आचार्य धन ( गुरु दक्षिणा ) देऊन, केंस अन दाढीचे मुंडन करून अन् काषाय वस्त्र धारण करून, घरदार सोडून प्रव्रजित होतो. तो अशा प्रकारें प्रव्रजित होऊन ( १ ) मैत्री युक्त चित्तानें, एका दिशेकडे व्याप्त होऊन जसा विहार करतो तसाच दुसऱ्या, तिसऱ्या अन् चौथ्या दिशेकडे विहार करतो. अशाच प्रकारें, तो वर, खाली, तिरपें, सर्वत्र, सर्व लोकांस मैत्रीयुक्त विपुल, महद्गत, अप्रमाण, वैर-रहित, लोकरहित चित्तानें विहार करतो. ( २ ) करुणायुक्त चित्तानें ( ३ ) मुदित चित्तानें अन् ( ४ ) उपेक्षायुक्त चित्तानें.

तो या चार ब्रह्मविहारांची भावना करून, काया सोडून मेल्यावर सुगतीस प्राप्त होऊन ब्रह्मलोकांत उत्पन्न होतो. अशा प्रकारे हे द्रोण ! ब्राह्मण ब्रह्मसम असतो.

आणि, हे द्रोण ! ब्राह्मण देवसम कसा असतो ? द्रोण ! ब्राह्मण दोन्हीं कडून सुजात असतो—तो अट्ठचाळीस वर्षांपावेतों कौमार्य ब्रह्मचर्याचे पालन करतो. अट्ठेचाळीस वर्षें ब्रह्मचर्य पालन करून, मंत्रांचे पठन करून तो आचार्य धनाचा शोध करतो. धर्मानें, अधर्माने नव्हे. हे द्रोण ! धर्म काय आहे ? न विकत घेतां अन् न विकतां, केवळ जल-सहित प्रदत्त-ब्राह्मणीस तो शोधतो. तो फक्त ब्राह्मणीजवळ जातो, क्षत्राणी जवळ जात नाहीं, वैश्य स्त्री जवळ जात नाहीं, निषादिनी किंवा वैणवीजवळ जात नाहीं, रथकारिणी जवळ जात नाहीं किंवा पुक्कसीजवळ जात नाहीं. तो गर्भिणी, दूध पाजणारी किंवा ऋतुमती जवळ जात नाहीं. हे द्रोण ! ब्राह्मण, गर्भिणी जवळ कां जात नाहीं ? दूध पाजणाऱ्या स्त्री जवळ कां जात नाहीं ? द्रोण ! ब्राह्मण गर्भिणी जवळ जाईल तर उत्पन्न होणारा पुत्र किंवा पुत्री अति शुक्राने उत्पन्न होतात. यामुळें, हे द्रोण ब्राह्मण गर्भिणी जवळ जात नाहीं. हे द्रोण ! ब्राह्मण जर दूध पाजणाऱ्या स्त्री जवळ जातो तर पुत्र किंवा पुत्री अशुचि पिणारे निपजतात. तो अऋतुमति जवळ कां जात नाहीं ? कारण अऋतुमति स्त्री त्याच्यासाठीं न कामार्थं, न मदार्थं न रतियोग्य, न सन्तति योग्य असते. तो पुत्र किंवा पुत्री उत्पन्न करून केंस अन् दाढीचे मुंडन करून, घरदार सोडून प्रव्रजित होतो. तो अशा प्रकारें प्रव्रजित होऊन, प्रथम ध्यान, द्वितीय ध्यान,

---

१४—"अट्टक आदि ऋषींनी दिव्य चक्षूंनी बघून भगवान् सम्यक सम्बुद्ध यांच्या वचनाबरोबर मंत्रांस परहिंसा शून्य ग्रंथित केले होते. त्यांत, इतर ब्राह्मणांनी प्राणि-हिंसा आदिचा समावेश करून तीन वेद बनवून बुद्धवचनाच्या विरुद्ध केले—" अट्ठकथा

तृतीय ध्यान अन् चतुर्थ ध्यानास प्राप्त करून विहार करतात. ते या चारी ध्यानांची भावना करून, शरीराचा त्याग करतात अन् मेल्यावर सुगतीस देवत्व प्राप्त करून स्वर्गलोकांत उत्पन्न होतात. तर, हे द्रोण ! ब्राह्मण असा असतो.

हे द्रोण ! ब्राह्मण मर्याद कसा असतो ? तर, हे द्रोण ! ब्राह्मण दोन्हीं कडून सुजात असतो. अट्ठेचाळीस वर्षांपावेतों कौमार्य ब्रह्मचर्याचे पालन करतो. ब्रह्मचर्य पालन करून, मंत्रांचे पठन करून, आचार्यास आचार्य धन देऊन तो भार्येचा शोध करतो. धर्मानें, अधर्मानें नव्हे ! तो फक्त ब्राह्मणी जवळ जातो. तो पुत्र किंवा पुत्री उत्पन्न करून त्याच पुत्र आनन्दच्या इच्छेनें कुटुंबात राहतो. तो प्रव्रजित होत नाहीं. ब्राह्मणांच्या ज्या जुन्या मर्यादा आहेत, त्यांत बांधून तो राहतो. त्यांचे तो अतिक्रमण करत नाहीं. यासाठीं, तो ब्राह्मण मर्याद म्हटला जातो.

हे द्रोण ! संभिन्न-मर्याद ब्राह्मण कसा होतो ? इथें, हे द्रोण ! ब्राह्मण दोन्हीं कडून सुजात असतो. अट्ठेचाळीस वर्षे कौमार्य ब्रह्मचर्य पालन करतो. आचार्य धन देऊन भार्येचा शोध करतो. धर्मानें देखील अन् अधर्मानें देखील. क्रय करून ही अन् विक्रय करून ही. तो ब्राह्मणी जवळ देखील जातो, क्षत्राणी जवळ ही जातो अन् ऋतुमति जवळ देखील जातो. त्याची ब्राह्मणी कामार्थ देखील असते अन् क्रीडार्थ देखील ! जुन्या ब्राह्मणांची जी मर्यादा आहे, त्यांत तो राहत नाहीं, त्याचे अतिक्रमणा करतो. यासाठींच तो ब्राह्मण संभिन्न मर्याद म्हटला जातो.

हे द्रोण ! ब्राह्मण, ब्राह्मण-चाण्डाल कसा होतो ? तर, हे द्रोण ! ब्राह्मण दोन्हीं कडून सुजात असतो. अट्ठेचाळीस वर्षे तो कौमार्य ब्रह्मचर्याचे पालन करतो. आचार्य धनाचा शोध करतो. धर्मानें देखील अन् अधर्मानें देखील. शेती करून देखील, व्यापार करून देखील, कोणा एका शिल्पानें किंवा केवळ भिक्षेने ही. आचार्य धन देऊन तो भार्येचा शोध

करतो. धर्मानें देखील अन् अधर्मानें देखील. तो ब्राह्मणीजवळ देखील जातो, अन् ऋतुमतीजवळ देखील. त्याची ब्राह्मणी-कामार्थ असते. तो सर्व कामानें जीविका उत्पन्न करतो. त्यास जेव्हां ब्राह्मण विचारतात— "आपण ब्राह्मण असून सर्व कामानें जीविका कां उत्पन्न करता ?" तेव्हां तो उत्तर देतो—'ज्याप्रमाणें अग्नि, शुचिस देखील जाळतो अन् अशुचीस देखील, तो त्याच्याशीं लिप्त राहत नाहीं, त्याचप्रमाणें ब्राह्मण सर्व प्रकारें आपली जीविका उत्पन्न करतो अन् त्यांत लिप्त राहत नाहीं."

"हे द्रोण ! तो सर्व कामें करून आपली जीविका उत्पन्न करतो, यासाठीं तो ब्राह्मण, ब्राह्मण-चाण्डाल म्हटला जातो. अशा प्रकारें, हे द्रोण ! ब्राह्मण, ब्राह्मण चाण्डाल असतो."

असें ऐकल्यावर द्रोण ब्राह्मण म्हणाला, "हे गौतम ! आम्हीं ब्राह्मण चांडाल होणार नाहीं."[1]

———

१—अंगुत्तर निकाय—५, ५, २ ।

# प्राचीन ब्राह्मण धर्म

## ब्राह्मणांच्या लोभामुळें धर्माचा विनाश

"हे गौतम ! आजकाल, काय ब्राह्मण जुन्या ब्राह्मण धर्मानुसार चालतांना दिसतात ?"

"अहो ब्राह्मण ! आजकाल ब्राह्मण जुन्या ब्राह्मण धर्मानुसार चालतांना दिसत नाहींत."

"हे गौतम ! आपण जर जुन्या ब्राह्मणांच्या ब्राह्मण धर्माबद्दल सांगाल, तर फार बरें होईल."

"तर ऐका, ब्राह्मण ! ऐका, नीट प्रकारे मनांत धारण करा. मी सांगत आहे."

"फार छान !" असें म्हणून त्या ब्राह्मण महाधनिकांनी भगवानांस उत्तर दिले. तेव्हां भगवान म्हणाले—

प्राचीन ऋषि संयमी अन् तपस्वी होते. पाँची कामगुणांस ( रूप, शब्द, गन्ध, रस, स्पर्श ) सोडून ते आपली कामें करीत. त्यावेळीं, ब्राह्मणांजवळ न पशु होते, न सुवर्ण किंवा चांदी अन् न तर अन्न. त्यांचा, स्वाध्याय हेंच धन-धान्य होते. ते ब्रह्मनिधिची रक्षा करत. त्यांच्यासाठीं जे भोजन श्रद्धेनें तयार करून द्वारावर ठेवलेले असे, शोध केल्यावर लोक तेच अन्न त्यांना देण्यायोग्य समजत असत. समृद्ध जनपद अन् राष्ट्र, नाना रंगाचे वस्त्र, शय्या अन् वासस्थानानें त्या ब्राह्मणांची पूजा करीत. ब्राह्मण अवध्य, अजेय अन् धर्म-रक्षित होते. कुलद्वारांवर कोणी ही त्यांना टोकत नसत. ते अट्ठेचाळीस वर्षे कौमार्य ब्रह्मचर्याचे पालन करीत. ते ब्राह्मण न तर दुसऱ्या स्त्री जवळ जात अन् न तर भार्या

विकत घेत[१]. परस्पर प्रेम आहे अशा स्त्रीशीच सहवास करणें त्यांना पसंत असे. ऋतुकाल सोडून, मधल्या निषिद्ध समयी ब्राह्मण कधीं ही मैथुन कर्म करीत नसत. ते ब्रह्मचर्य, शील, सरलता, नम्रता, तप, कोमलता, करुणा अन् क्षमेची प्रशंसा करीत असत.

जो त्यांच्यांत सर्वोत्तम, दृढ, पराक्रमी ब्रह्मा होता, त्यानें स्वप्नांत देखील कधीं ही मैथुन धर्माचे सेवन केले नाहीं. त्याच्या आचरणास अनुसरून, पण्डित-जन ब्रह्मचर्य, शील अन् क्षमेची प्रशंसा करीत. ते तांदूळ, शय्या, वस्त्र, घृत अन् तेल मागून, धर्मानुसार यज्ञ करीत असत. यज्ञाच्या वेळी गाईस मारत नसत. ज्याप्रमाणें माता-पिता, भाऊ अन् इतर बन्धु आहेत त्याचप्रमाणें गाई आमच्या परम मित्र आहेत, ज्यांच्या मुळें औषधी उत्पन्न होते. त्याच अन्न, बल, वर्ण ( रूप ) अन् सुख देणाऱ्या आहेत. असा विचार करून ते गाईंस मारत नसत. सुकुमार, महाकाय, वर्णवान्, यशस्वी ब्राह्मण धर्मानुसार; आपल्या कर्त्तव्यांत तत्पर

---

१—ज्याप्रमाणें, आजकाल लोक इतर वस्तू विकत घेतात त्याप्रमाणें ते धर्मपूर्वक स्त्रीचा शोध करीत. कशा प्रकारें ? अट्ठेचाळीस वर्षें ब्रह्मचर्य पालन करून ब्राह्मणाच्या द्वारावर जाऊन कन्या मागत—"मी अट्ठेचाळीस वर्षांचा पूर्ण ब्रह्मचारी आहे, जर तुझ्या घरी युवा कन्या असेल तर मला दे." तेव्हां, ज्याच्याजवळ युवा कन्या असे, तो तिला अलङ्कृत करून द्वारावर उभ्या असलेल्या ब्राह्मणाच्या हातांत जल देऊन म्हणे—" हे ब्राह्मण ! मी तुला सांभाळण्यासाठीं ही कन्या देत आहे". इतक्या दिवस पावेतो ब्रह्मचर्य पालन करून ही ते स्त्रीचा शोध कां करीत होते ? "जो पुत्र उत्पन्न करत नाहीं तो कुलवंश छेदक आहे, तो जीवन पर्यन्त ब्रह्मचारी राहत नाहीं. तो नरकांत जातो." जे मिथ्यादृष्टी आहेत, त्यांची अशी धारणा आहे.

—अट्ठकथा.

होऊन काय करीत. जोपावेतो ते वर्तमान होते, तोपावेतो प्रजा सुखी होती.

हळूं-हळूं, राजाची सम्पत्ति, समलंकृत स्त्रिया, उत्तम घोडे, सुन्दर रचनायुक्त अन् विचित्र शिवण कामानें युक्त असे रथ, मोठमोठाले वाडे अन् घरें पाहून त्यांचे मन पालटले. गोमण्डलानें घिरलेले, रूपवती स्त्रीगण सहित, विपुल मानवी भोगांचा ब्राह्मणांनी लोभ केला. मग ते मंत्रांची रचना करून इक्ष्वाकु जवळ पोंचले अन् त्यास म्हणाले—"तू धन-धान्यानें समृद्ध आहेस, तेव्हां तू यज्ञ कर ! तुझ्या जवळ बरीच संपत्ति आहे, तेव्हां तूं यज्ञ कर." ब्राह्मणांद्वारा असे म्हटल्यावर, रथपति राजाने अश्वमेध, पुरुषमेध[1], सम्मापास, वाजपेय, निरर्गल ( सर्वमेध ) इतके यज्ञ करून ब्राह्मणांस धन दिले.

गाई, शय्या, वस्त्र, अलंकृत स्त्रिया, उत्तम घोडयांनी जोतलेले सुन्दर रचनायुक्त अन् विचित्र शिवण कामानें तयार केलेले रथ, मोठमोठाले वाडे अन् घरें, नाना धान्यांनी भरून, त्यांनी ब्राह्मणांस दान दिले. त्यांनी धन एकत्र करणें पसंद केले. लोभांत चूर असलेल्या ब्राह्मणांची तृष्णा आणखी वाढली.[2] ते मंत्र तयार करून पुन्हां इक्ष्वाकु जवळ आले

---

१—यज्ञ करण्यासाठीं एकवीस यूप ( यज्ञस्तम्भ ) स्थापित करून पुरुष अन् सम्पूर्ण दक्षिणेच्या वस्तू , यज्ञासाठीं आणत.

—अट्ठकथा.

२—दूध अन् पांच गोरस गाईंचे स्वादिष्ट पदार्थ आहेत. तेव्हां त्यांचे मांस आणखी ही स्वादिष्ट असेल. अशा प्रकारें मांसासाठीं त्यांची तृष्णा आणखी ही वाढली. त्यांनी विचार केला—'जर आम्हीं मारून खाऊं तर आमची निन्दा होईल. तेव्हां, मंत्र रचले तर काय हरकत आहे ?' तेव्हां पुन्हा वेदांस तोडून मोडून आपल्या अनुरूप त्यांनी मंत्र रचले. मग ते इक्ष्वाकु राजाजवळ गेले.

—अट्ठकथा.

अन् म्हणाले—"ज्याप्रमाणें पाणी, पृथ्वी, हिरण्य, धन-धान्य आहे त्याचप्रमाणें गाई मनुष्यांसाठी आहेत. त्या प्राण्यांच्या उपभोगासाठीं आहेत. तुझ्या जवळ बरेंच धन आहे. तूं यज्ञ कर ! तुझ्याजवळ बरीच संपत्ति आहे, यज्ञ कर." तेव्हां ब्राह्मणां द्वारा प्रेरित होऊन, रथपति राजानें अनेक सहस्र हजार गाईंचा यज्ञांत वध केला. ज्या गाई पायानें, शिंगानें, किंवा इतर कोणत्या ही अंगानें मारत नाहींत, ज्या शेळी प्रमाणें प्रिय अन् घागर भरून दूध देणाऱ्या आहेत, त्यांची शिंगे धरून राजाने त्यांस शस्त्रानें मारले.[१]

तेव्हां, देवता, पितर, इन्द्र, असुर अन् राक्षस ओरडले—"अधम झाला ! गाईवर शस्त्र उगारले—अधर्म झाला."

पूर्वी तीनंच रोग होते—( १ ) इच्छा ( २ ) भूक अन् ( ३ ) जरा. पशूंच्या हत्येमुळें ते अट्ठयाणव झाले. हा अधर्म जुन्या धर्मदण्डांपासून रहित होता.

"पुरोहित निर्दोषींस मारतात, धर्मांचा ध्वंस करतात."—अशा प्रकारें, हे प्राचीन विज्ञांच्या दृष्टीनें निन्दित नीच कर्म आहे. जिथें असे पुरोहित दिसतात, लोक त्यांची निन्दा करतात. अशा प्रकारें, धर्म बिघडल्यावर शूद्र अन् वैश्य फुटले. क्षत्रिय देखील छिन्न-विछिन्न झाले. स्त्री पतीचा अपमान करूं लागली. क्षत्रिय, ब्राह्मण अन् दुसरे जे गोत्रांमुळें रक्षित होते, ते जातिवादाची अवहेलना करून सर्व कामभोगाच्या वशांत सांपडले."[२]

---

१—ब्राह्मण यज्ञ-स्थळास गाईंनी पूर्ण करून मंगल बैलास बांधून राजाजवळ घेऊन गेले अन् म्हणाले—'महाराज ! गोमेध यज्ञ करा, यानें ब्रह्मलोकाचा मार्ग विशुद्ध होतो. राजाने देखील, मंगल कार्य करून, तलवार घेऊन बैलांबरोबरंच अनेक सहस्र गाईंचा वध केला. यज्ञ-स्थलांत, ब्राह्मण मांस कापून-कापून खात होते. —अट्ठकथा.

२—सुत्तनिपात—२, ७ ।



# जातीचा फक्त देखावा आहे

## जात न विचारतां आचरण विचारावे

"आपली जात कोणती ?"

"जात विचारूं नकोस, आचरण विचार ! काष्ठापासून अग्नि तयार होतो. नीच कुळांतील पुरुष देखील धृतिमान, जाणकार, पाप-रहित, मुनी असूं शकतो. जो सत्याचे पालन करीत जितेन्द्रिय, दमन-युक्त ज्ञानाच्या शेवटापावेतों पोंचलेला अन् ब्रह्मचर्य पालन करणारा आहे तो यज्ञ-प्राप्त आहे अन् तो कालानें दान-पात्रांत होम करतो."

"माझा हा यज्ञ अवश्य सु-इष्ट अन् सुहुत आहे की मी आपल्या सारख्या ज्ञानींचे दर्शन घेतले. आपल्या सारख्यांस न बघून दुसरे जन हव्य शेष खातात. हे गौतम ! आपण भोजन करावे, आपण ब्राह्मण आहांत."

"............ ब्राह्मण ! लाकूड जाळून शुद्ध बनूं नकोस. हा देखावा आहे. पण्डित लोक त्यानें शुद्धि सांगत नाहींत जी बाहेरची नसून आंतली आहे. हे ब्राह्मण ! मी दारु-दाह सोडून आंतली ज्योति प्रज्वलित करतो. नित्य अग्नियुक्त, एकांत चित्त धारण करून मी ब्रह्मचर्य पालन करतो. ब्राह्मण ! तुझा हा अभिमान खड्डूप्रमाणें भुसभुशीत आहे. हा क्रोध धूर आहे, मिथ्या भाषण भस्म आहे, जिह्वा स्त्रुवा आहे अन् हृदय ज्योतिचे स्थान आहे.

आपले दमन केल्यानें पुरुषास ज्योति प्राप्त होते. ब्राह्मण ! शील-तीर्थ

युक्त सज्जन व्यक्तीं द्वारा प्रशंसित निर्मल धर्म सरोवर आहेत ज्यांत स्नान करून, शरीर न पुसतां त्या पारी उतरतात. ब्रह्म ( श्रेष्ठ ) प्राप्त, सत्य, धर्म, संयम अन् ब्रह्मचर्यावर आश्रित आहे. तेव्हां तू हवन समाप्त केलेल्यांस ( मुक्त ) नमस्कार कर, त्यांना मी दम्य सारथी ( चाबुकस्वार ) म्हणतो."[1]

———०———

१—संयुत्त निकाय १, ७, १, ९ ।



# मनुष्यांत जाति-भेद नाहीं

## खाण्यापिण्यांत जात विचारणें मूर्खपणाचे आहे

एकदां भगवान श्रावस्तींत अनाथपिंडिकच्या जेतवन नामक आश्रमांत विहार करीत होते.

तेव्हां पूर्वान्हांत आयुष्मान आनन्द पात्र चीवर घेऊन भिक्षाटनासाठीं नगरांत प्रविष्ट झाले. मार्गांत त्यांना तहान लागली. एका विहिरीवर, एका चांडाळाची 'प्रकृति' नामक कन्या पाणी भरत होती. आयुष्मान आनंदनें पाणी मागितलें. चांडाल कन्या म्हणाली—"भन्ते ! मी चांडाल कन्या आहे, आपणास पाणी कसे देऊं ?" हे ऐकून आयुष्मान आनन्द म्हणाले—"मी तुला हे विचारले नाहीं की तू कोणत्या जातीची आहेस. मी तुझ्याजवळ फक्त पाणी मागितले." तेव्हां, चांडाल कन्या प्रकृतीने, सौम्य भावानें आयुष्मान आनन्दच्या पात्रांत आपल्या घागरींतून शीतल जल ओतले अन् ते पाणी पिऊन निघून गेले.

### जातीचा अभिमान कां ?

प्रकृतिने आयुष्मान आनन्द यास जल देऊन अत्यंत प्रसन्नतेचा अनुभव केला आणि ती भगवानांच्या दर्शनार्थ जेतवनांत गेली. भगवानांनी तिचे चित्त ओळखून, तिला अनुकूल धर्मोपदेश केला. ती तथागतांच्या धर्मोपदेशानें उद्‌बोधित, उत्साहित अन् संविग्न होऊन भिक्षुणींजवळ प्रव्रजित झाली.

जेव्हां, हा समाचार श्रावस्तीच्या ब्राह्मणांनी ऐकला तेव्हां ते परस्पर म्हणूं लागले—भिक्षुणी संघांत एक चांडाल कन्या प्रव्रजित झाली आहे. पाहूं ती क्षत्रिय अन् ब्राह्मणांच्या घरांत भिक्षा मागण्यास कशी जाते ?

त्यांनी कोशल नरेश प्रसेनजित यास देखील या घटनेविरुद्ध भडकविले. राजा स्वत: उत्तेजित होऊन, रथांत बसून ही गोष्ट विचारण्यासाठीं भगवानांजवळ आला अन् त्यांना प्रणाम करून व कुशल क्षेम विचारून. एकीकडे जाऊन बसला. एकीकडे बसलेल्या कोशल नरेश प्रसेनजित यानें भगवानांशी या बाबतींत चर्चा केली.

शास्ता म्हणाले—"महाराज! अतीत काळांत त्रिशंकु नामक, चांडालांचा एक राजा होता. त्याच्या पुत्राचे नांव शार्दूल असे होते. तो अत्यंत सुन्दर अन् प्रासादिक होता. त्यानें विधिवत सर्व शास्त्रांचा अभ्यास केला होता. त्रिशंकूस आपल्या पुत्रासाठीं कन्येची आवश्यकता होती. तो पुष्करसारी नामक एका ब्राह्मणाजवळ गेला अन् त्यानें त्याची कन्या आपल्या पुत्रासाठीं मागितली. ब्राह्मण म्हणाला—"तू चांडाल आहेस अन् मी ब्राह्मण आहे. चांडाल चांडालांबरोबर अन् ब्राह्मण ब्राह्मणाशीं नातें जोडतात. तू मला असें विचारून माझा अपमान केला आहेस."

त्रिशंकूने उत्तर दिले—"हे पुष्करसारी! ब्राह्मण अन् चांडाल—दोन्हीं एकाच योनींत उत्पन्न होतात, ब्राह्मण आकाशांतून येत नाहींत. क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य अन् शूद्र हे केवळ नाम मात्रासाठीं आहेत जे माणसानें तयार केले आहेत. ज्याप्रमाणें लहान मुलें सडकेवर खेळत असतात अन् मातीची खेळणी तयार करून त्यांस भिन्न-भिन्न नांवें देतात—कुणास खीर, कुणास दही, कुणास घृत म्हणतात, परंतु त्यांच्या तशा म्हटल्यानें, खेळणी तशी होत नाहींत; त्याचप्रमाणें माणसानें क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य अन् शूद्र अशी भिन्न-भिन्न नांवे दिल्यानें त्यांच्यात कोणता भेद उत्पन्न होत नाहीं, त्यांचे डोळे, नाक, तोंड सर्व एक प्रकारचे असतात. ज्या प्रकारचा भेद गाय, घोडा, गाढव, मेंढरें, शेळी अन् पशूंच्या जातींत मिळतो असा कोणता ही भेद माणसांच्या चार वर्णांत मिळत नाहीं, तेव्हां जातीचा अभिमान करणें उचित नाहीं."

त्रिशंकूच्या गोष्टी ऐकून पुष्करसाति यास अत्यंत प्रसन्नता झाली. हे जाणून की शार्दूल सर्व शास्त्र निष्णात आहे त्यानें आपल्या कन्येशी त्याचा विवाह करून दिला."

भगवानांचा अशा प्रकारचा धर्मोपदेश ऐकून कोशलनरेश प्रसेनजित गद्गद् झाला. त्याचा, वर्णाच्या अभिमानाचा सन्देह दूर झाला. तो भगवानांच्या चरणांची वंदना करून आसनावरून उठून चालता झाला आणि नगरांत व्याप्त असलेल्या त्या चर्चेस त्याने शान्त केले.[1]




---

१—महायान.

# ममता-प्रकाशनाचे बौद्ध-वाङ्मय

## [ मराठीभाषेत ]

| | | |
|---|---|---|
| १. बौद्धधर्म हाच मानवधर्म | डा० भीमराव आंबेडकर | १ रु०-०० |
| २. बौद्धधर्माची मूळतत्त्वें | भिक्षु धर्मरक्षित | ७५ न० पै० |
| ३. तथागत-हृदय | ,, | ७५ न० पै० |
| ४. पंचशील कथा | ,, | १ रु०-०० |
| ५. धम्मपद | ,, | १ रु० ५० न० पै० |
| ६. जातिभेद आणि बुद्ध | ,, | १ रु०-० |
| ७. तेलकटाह गाथा | ,, | ७५ न० पै० |
| ८. बौद्ध-शिशु-बोध | ,, | ५० न० पै० |
| ९. तथागतांचा प्रथम संदेश | ,, | २५ न० पै० |
| १०. भगवान् बुद्धांची शिकवण | देवमित्र धर्मपाल | ६२ न० पै० |
| ११. डा० आम्बेडकर आणि बौद्धधर्म | (प्रेस में) भिक्षु धर्मरक्षित | |
| १२. खुद्दक-पाठ | भिक्षु धर्मरत्न | २५ न० पै० |
| १३. बौद्ध-साधना | (प्रेस में) भिक्षु धर्मरक्षित | |
| १४. जातक कथा | | |
| १५. बौद्ध-संस्कार-पद्धति | भिक्षु धर्मरक्षित | ५० न० पै० |
| १६. मिलिन्द प्रश्न | | |

मिळण्याचें ठिकाण—

**व्यवस्थापक, ममता-प्रकाशन,**
**कबीरचौरा, वाराणसी—१**
**( उत्तर प्रदेश )**